# सुलभ-केकावली.



मयूरकवीकृत केकावली, श्लोकांचा सुलभ गद्यार्थ, कठिण शब्दांचा अर्थ, शब्दांचें व समासाचें स्पष्टीकरण, कथासंबंधकथन, यांसह



हें पुस्तक

मराठी कवितेचा अभ्यास करणारांसाठीं

**रामचंद्र भिकाजी जोशी**

यांनीं तयार केलें.

तें


रा० रा० शंकर नरहर जोशी चित्रशाळेचे व्यवस्थापक यांनीं १०२६ सदाशीव पेठ, पुणें शहर, येथें छापून प्रसिद्ध केलें.

---

सन १९२५.

आवृत्ति चवथी.

किंमत सहा आणे.

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.



या पुस्तकाची पहिली आवृत्ति इ० स० १८९९ सालीं छापून प्रसिद्ध झाली. प्रथम आवृत्तींत झालेले मुद्रणदोष टाळण्यापलीकडे या आवृत्तींत विशेष कांहींच केलें नाहीं; म्हणजे प्रथम आवृत्तीचें हें केवळ पुनर्मुद्रण आहे. सदर प्रकारचीं दुसरीं दोन चार पुस्तकें असतांही प्रस्तुत पुस्तकाची प्रथम आवृत्ति बरीच लवकर खपली. यावरून सदर पुस्तक आपली कामगिरी योग्य रीतीनें बजावीत आहे, असें म्हणावयास कांहींच हरकत नाहीं. प्रथम आवृत्तीला जसा लोकाश्रय मिळाला तसा या नूतन आवृत्तीसही मिळेल असा भरंवसा आहे.

प्रकाशक.

# प्रस्तावना.

( पाहिल्या आवृत्तीची. सन १८९९. )

मोरोपंतकृत केकावली या मनोरम काव्याचा अभ्यास करणाऱ्यांना साह्यभूत असें एकादें लहानसें पुस्तक सध्यां उपलब्ध नाहीं. ती उणीव काढून टाकण्यासाठीं हें पुस्तक तयार केलें आहे. यांत प्रथमतः प्रत्येक केका अर्थद्योतक विरामचिन्हें देऊन लिहिली आहे. पुढें सुलभ भाषेंत अर्थ दिला आहे, नंतर टीपेंत शब्दार्थ, समास, कथासंबंध इत्यादिकांचें थोडक्यांत स्पष्टीकरण केलें आहे. क्वचित् ठिकाणीं केकांचा अन्वयही दिला आहे.

हें पुस्तक तयार करण्याचे कामीं दादोबांची 'यशोदा पांडुरंगी,' परशुरामपंत तात्यांचा 'केकादर्श' व केकावलीची काव्यसंग्रहांतील विस्तृत आवृत्ति यांचें मला फार साह्य झालें; याबद्दल त्यांचा मी ऋणी आहें. जेथें अर्थाच्या संबंधानें या सर्वमान्य ग्रंथकारांचा मतभेद दिसला, तेथें मला योग्य दिसला तो अर्थ केला आहे. कित्येक ठिकाणीं मला निराळाच अर्थ करणें योग्य वाटलें; तेथें तसें केलें आहे.

हें पुस्तक तयार करण्याचा हेतु वाचणारांस चांगले रीतिचें साह्य व्हावें एवढाच आहे. केकावलीचा अर्थ समजण्यांत विद्यार्थ्यांना आपल्या बुद्धीचा कांहीं तरी उपयोग करतां यावा त्यांना केवळ पुस्तकांतला अन्वयार्थ पाठ करून तयारी करण्याची पाळी येऊं नये, अशी यांत योजना केली आहे. हें पुस्तक ज्या हेतूनें तयार केलें आहे, तो हेतु भक्त-मयूर-कृपाघन राम पूर्ण करो!

---

## मोरोपंतकृत

# केकावली.



सदाश्रितपदा, सदाशिवमनोविनोदास्पदा,
स्वदासवशमानसा, कलिमलांतका, कामदा,
वदान्यजनसद्गुरो, प्रशमितामितासन्मदा,
गदारिदरनंदकांबुजधरा, नमस्ते सदा ! १

हे परमेश्वरा, तुझ्या पायांचा साधूंनीं आश्रय केला आहे; तूं शंकराच्या मनाच्या आनंदाचें स्थान आहेस; तुझें मन तुझ्या भक्तांचे स्वाधीन असतें; तूं कली म्हणजे कुहेतु जो, तत्संबंधी पापाचा नाश करितोस; तूं इच्छित असेल तें देतोस; तूं दातेजन जे त्यामध्यें श्रेष्ठ आहेस; तूं असंख्य दुष्टांचा गर्व नाहींसा केला आहेस; तूं गदा, चक्र, शंख, नंदख नामक खड्ग व कमल अशीं आयुधें धारण करितोस---अशा तुला माझें निरंतर नमन असो !

सद्+आश्रित+पद=साधूंनीं आश्रित आहेत पाय ज्याचे, बहु० स०. सदाशिव+मनो+विनोद+आस्पद=सदाशिवाच्या मनाच्या विनोदाचें म्हणजे आनंदाचें स्थान, स्वदास-वश-मानस=आपल्या दासांना वश आहे मानस ज्याचें, बहु० स० कलिमलांतक= कलीसंबंधीं जो मल म्हणजे पाप, त्याचा नाश करणारा. वदान्य-जन-सद्गुरु=दाते जनांमध्यें श्रेष्ठ. प्रशमित+अमित+असन्मद=प्रशमित म्ह० शांत केले आहेत अमित म्हणजे अगणित असत् म्हणजे दुष्ट जे त्यांचे मद म्हणजे गर्व ज्यानें, बहु० स०. नंदक हें विष्णूच्या खड्गाचें नांव आहे-नमः+ते=हे दोन संस्कृत शब्द आहेत-नमः हें अव्यय; अर्थ. नमस्कार असो; ते-तुला.

पदाब्जरज जें तुझें सकलपावनाधार तें,
अघाचलहि तारिलें बहु तुवांचि राधार तें;

अजामिळ, अघासुर, व्रजवधू, बकी, पिंगळा,
अशा गति दिली; उरे न तृण भेटतां इंगळा. २

तुझ्या पदकमलाची जी धूली, ती शुद्ध करणारे म्हणजे पाप हरण करणारे जे सर्व पदार्थ, त्यांना आधारभूत आहे; तूं जो राधेच्या ठिकाणीं प्रेम ठेवणारा, त्या त्वां पापाचे केवळ पर्वत, असे पुष्कळ जन तारिले; अजामिळ, अघासुर, व्रजवधू ( गोकुळांतल्या स्त्रिया ), बकी, पिंगळा अशा पापी जनांना त्वां सद्गति दिली; गवतास अग्नीचा स्पर्श झाला असतां तें उरत नाहीं,–जळून जातें. त्याप्रमाणें माझें पाप तुझ्या पदरजापुढें उरणार नाहीं, नाश पावेल.

पद+अब्ज+रज=पदरूपीं जें कमळ त्याची किंवा त्यांतील धूली; पावन=पावन करणारा पदार्थ. अघ+अचल=पापाचा पर्वत; राधा+रत=राधेवर प्रेम करणारा; राधाकृष्णांचें प्रेम सुप्रसिद्धच आहे; अजामिळ=हा एक पापी होता, यानें मरणसमयीं देवाचें नांव घेतलें, तेव्हां तो तरला; अघासुर हा एक दैत्य कृष्णावतारीं कृष्ण लहान असतां त्यास मारण्यास आला होता; व्रजवधू=गोकुळांतल्या स्त्रिया– या पातकी होत्या अशी समजूत. बकी=पूतना नामक राक्षसी; ही कृष्ण लहान असतां स्तनांत विष भरून त्याला तें पाजून मारावें या उद्देशानें गोकुळास गेली पण कृष्णानें तिला मारून तिचा उद्धार केला; पिंगळा=ही एक वेश्या होती; तिला पश्चात्ताप होऊन ती ईश्वरभजनीं लागल्यामुळें तरली.

तुझ्या बहुत शोधिले अघनिधी पदाच्या रजें;
न तें अनृत वर्णिती बुध जनीं सदाचार जें;
असें सतत ऐकतें, सतत बोलतें, मीच तें–;
प्रमाण न म्हणों जरी, उचित माझिया नीचतें. ३

" तूं माझ्याकडे कां आलास, मीं तुला तारीन असें कशावरून ? " असें परमेश्वर विचारील अशी शंका घेऊन कवी म्हणतो:—

तुझ्या पायांच्या धूळीच्या योगानें पापाचे केवळ निधीच असे पुष्कळ लोक शुद्ध झाले ( तरले ), ज्यांचा उत्तम आचार आहे ( म्हणजे जे कधीं खोटें बोलणार नाहींत ); असे शहाणे लोक जनामध्यें असें सांगतात; तें कांहीं खोटें नाहीं. असे नेहमीं ऐकत आलेले व नेहमीं असें सांगणारे जे बुधजन ते विश्वासास योग्य आहेत असें जर मीं म्हटलें नाहीं तर त्यायोगानें मीं नीच ठरेन.

शोधिले--शुद्ध केले, तारले; अनृ+कृत=असत्य: सत्+आचार=सत् म्हणजे शुद्ध आहे आचार म्ह० वर्तन ज्यांचे–बहु० स०. असें सतत ऐकते–बोलते, इ० असें पूर्वींच्या साधूंनीं सांगितलेलें ऐकत आलेलें व स्वतःही तसें सांगणारे; प्रमाण=ज्यांचेवर विश्वास ठेवावा असे, असें सतत ऐकतें–इ०–याबद्दल 'असें शत, न एक ते सतत बोलते–' इत्यादि पाठ आहे त्याचा अर्थ, ' असें बोलणारे म्हणजे सांगणारे शेंकडों आहेत, एकच नाहीं, ' असा होईल.

**तसाचि उरलों कसा, पतित मी नसें काय ? कीं–**
**कृपाचि सरली, असेंहि न घडे जगन्नायकीं;**
**नसेन दिसलों कसा, नयन सर्वसाक्षी रवी,**
**विषाद धरिला म्हणों, न सुरभी विष, क्षीर वी. ४**

मी अजून तसाच म्हणजे तारण झाल्याखेरीज कसा राहिलों आहे? मी पापी नाहीं काय? किंवा परमेश्वराजवळची कृपाच सरली असें म्हणावें ? पण सर्व जगाचा जो नायक, त्याची कृपा सरली असें होणार नाहीं ( कारण एवढ्या मोठ्या जगाचा जो नायक, त्याचे जवळ कृपा फार असली पाहिजे ). कदाचित् दिसलों नसेन,—तर सर्व पाहणारा जो सूर्य तो त्या परमेश्वराचा डोळा असून असें कसें होईल ? परमेश्वरानें मजवर रोष केला असें म्हणावें तर कामधेनू जी, ती कधींही विष देणार नाहीं, दूधच देईल.

सर्वसाक्षी=सर्व पाहणारा; सूर्य हा परमेश्वराचा डोळा आहे. असें सांगितलें आहे; विशाद=राग; 'म्हणों-' याचा कर्ता आम्ही; सुरभी=कामधेनू-देवांची गाय आहे, ती इच्छिलेलें देतें; पण ती एकाद्या विषासारख्या घातक पदार्थाची इच्छा केली तर तो देणार नाहीं, चांगला पदार्थच देईल.

व्रजावन करावया वसविलें नखाग्रीं धरा,
सलील तइं मंदिराख्यहि नग स्वपृष्ठी धरा;
वराह–तनु घेऊनी उचलिली रदाग्रें धरा,
सुदुर्धर तुम्हां कसा पतित हा ? न कां उद्धरा ? ५

तुम्हीं गोकुळाचें रक्षण करण्यासाठीं आपल्या नखाचे अग्रावर पर्वत उचलिला; तेव्हां एकदां ( म्हणजे समुद्रमंथनाचे वेळीं ) मंदर नांवाचा पर्वत आपल्या पाठीवर सहज धारण केला; पृथ्वी रसातळीं गेली असतां वराहाचें रूप धारण करून आपल्या दांताच्या अग्रानें ती उचलिली; (अशा मोठमोठ्या गोष्टी तुम्हीं सहज केल्या, मग) हा मी जो पापी, हाच तुम्हांस उद्धरण्यास कठीण असा कसा झालों ? याचा उद्धार कां करीत नाहीं ?

व्रजावन इ०=अवन म्ह० रक्षण; एकदां इंद्रानें गोकुळावर पुष्कळ पाऊस पाडण्यास आरंभ केला; तेव्हां कृष्णानें गोवर्धन नामक पर्वत आपल्या एका नखावर उचलून तो गोकुळावर धरून गोकुळाचें रक्षण केलें. समुद्रमंथनाची कथा अशी आहे कीं, देव व दैत्य यांना अमृत हवें होते, म्हणून तें काढण्यासाठीं ते समुद्राचें मंथन करूं लागलें; तेव्हां मंदर नामक पर्वताची रवी केली होती,त्या रवीला खालीं आधार पाहिजे म्हणून विष्णूनें कांसवाचें रूप धारण केलें. व तो पर्वत पाठीवर घेतला.वराहतनु-इ०=दैत्यांनीं पृथ्वी पाताळीं नेऊन घातली होती.ती देवानें वराहाचें रूप घेऊन आपले दातांवर सहज उचलून घेऊन वर आणिली.

नतावन धृत–व्रत ज्वलन तूंचि बाधावनीं,
पद–प्रणत–संकटीं प्रजव तूंचि, बा, धावनीं;

**दया प्रकट दाखवी कवण सांग त्या वारणीं,**

**सति–व्यसन–वारणीं, जयजयार्थ त्या वा रणीं ? ६**

या संसाररूपी दुःखमय अरण्यामध्यें शरण आलेल्याचें रक्षण करणें हेंच व्रत ज्यानें धारण केलें आहे, असा अग्नि तूच आहेस (एकाद्या प्रचंड अरण्याचा नाश करण्यास अग्नीच पाहिजे, म्हणून येथें परमेश्वरास अग्नीची उपमा दिली); तुझ्या पायांना शरण आलेले जे तुझे भक्त, त्यांचेवर संकट आलें असतां त्यांच्या रक्षणार्थ धांवत जाण्यास वेगवान् असा तूंच; उदाहरणार्थ, त्या गजेंद्रावर दया कोणी केली ? पतिव्रता जी द्रौपदी तिचें संकट कोणी वारिलें ? अथवा त्या (कौरव–पांडवांच्या) संग्रामामध्यें अर्जुनास जयप्राप्ति व्हावी म्हणून दया कोणी दाखविली, सांग !

नत+अवन+धृत+व्रत+ज्वलन=शरण आलेल्याचें रक्षण करणें हेंच धारण केले आहे व्रत ज्यानें, असा अग्नि; बाधा+वन=बाधा म्हणजे संसाररूपी दुःखें त्यांचे अरण्य; प्रजव=वेगवान्; वारण=हत्ती, गजेंद्र;पूर्वी गजेंद्र नामक हत्ती विष्णूचा भक्त होता; एकदां तो नदीवर गेला असतां एका नक्रानें त्याचा पाय धरून ओढला, तेव्हां त्यानें विष्णूचा धांवा केला व विष्णूनें त्यास सोडविलें, सतिव्यसन–इ०= द्रौपदीची अनेक संकटें कृष्णानें निवारण केलीं;जय-जयार्थ इ० =भारतीय युद्धांत कृष्णानें अर्जुनाची अनेक प्रकारें साहाय्य करून त्याचें रक्षण केलें व त्यास जय मिळावा अशा युक्त्या केल्या.

**सुपात्र न रमाहि यद्रतिसुखास, दारा परी,**

**असा प्रभुहि सेवकां भजसि खासदारांपरी;**

**प्रियाकुचतटीं जिहीं न बहुवार पत्रावळी,**

**तिहीं अमित काढिल्या नृपमखांत पत्रावळी. ७**

लक्ष्मीसारखी सर्वगुणसंपन्न पत्नी असूनहि ज्याला ती विलासास योग्य वाटत नाहीं, असा (चोखंदळ) तूं प्रभु आपल्या भक्तांस

मोतद्दार होऊन भजतोस ( म्हणजे भक्तांची अगदीं हलकी सेवाही करितोस ) ; जिहीं म्हणजे ज्या हातांनीं प्रिय स्त्रीच्या हृदयप्रदेशावर वेलबुट्ट्या फारशा कधीं काढल्या नाहींत, त्या हातांनीं धर्माच्या यज्ञामध्यें असंख्य उष्टीं काढली.

खासदार–जोतद्दार,हलका चाकर,पत्रावळी–विलासीजन आपल्या प्रिय स्त्रियांच्या अंगावर सुगंधित रंगद्रव्यांनीं वेलबुट्ट्या काढीत नृप--मखांत–धर्मराजानें राजसूय यज्ञ केला, तेंव्हां श्रीकृष्णानें त्यास अगदीं हलकी सेवा करूनही साहाय्य केलें.

न पावसि म्हणोनि मी म्हणतसें तुला आळशी,
बरी न असदुक्ति हे रविसखोत्थिता आळशी;
असंख्य जन तर्पिले क्षुधित एकला जेमनीं—
चुकेल, तरि त्यास दे, परि वदान्ये लाजे मनीं ८

हे देवा, तूं मला अजून पावत नाहींस,म्हणून मी तुला आळशी म्हणतों; हें माझें वाईट बोलणें रविसख जो सत्राजित त्यानें घेतलेल्या आळासारखें चांगलें नाहीं, एकाद्या दात्यानें असंख्य जनांना भोजन देऊन तृप्त केलें, आणि एकच भुकेलेला मनुष्य जर चुकून राहिला, तर त्यांस दाता अन्न देतो, पण मनांत लाजतो. ( त्याप्रमाणें तूं असंख्य जनांस उद्धरिलें, आणि मी एकटाच चुकून राहिलों, तर माझा उद्धार कराल; पण ही गोष्ट तुम्हांस वाईट वाटण्यास कारण होईल, यासाठीं माझा लवकर उद्धार करा ).

रवि+सख+उत्थिता इ०–कृष्णावतारीं सत्राजित म्हणून एक रविसख म्हणजे सूर्यभक्त होता, त्याला सूर्यानें स्यमंतक नांवाचें रत्न दिलें होतें. तें रत्न त्याच्यापासून चोरीस गेलें असतां तें कृष्णानेंच चोरिलें असें त्यानें बालंट घेतलें. तें घालविण्यासाठीं कृष्णानें त्या मण्याचा शोध लावून दिला अशी कथा आहे. आळ हा शब्द येथें स्त्रीलिंगी आहे.

**अगा प्रणतवत्सला, म्हणति त्या जनां पावलां,**
**म्हणून तुमच्याच मी स्मरतसें सदा पावलां;**
**करूं बरि कृपा, हरूं व्यसन, दीन हा तापला--**
**असें मनिं धरा, खरा भरंवसा मला आपला. ९**

हे प्रणतवत्सला, म्हणजे तुला अत्यंत नम्र झालेले जे तुझे भक्त त्यांच्याविषयीं दयाळू अशा देवा, त्या जनां म्हणजे मागें जे जन तुम्हीं तारिले त्यांना, प्रसन्न झालां असें म्हणतात, म्हणून तुमच्याच पायांचें मी स्मरण करितों; यासाठीं "याचेवर चांगली कृपा करूं, याचें संकट निवारूं, या दीनाला फार ताप झाला आहे," असें आपल्या मनांत वागवा; मला तुमचा खरा भरंवसा आहे; म्हणजे तुम्ही असें मनांत वागवाल अशी माझी खात्री आहे.

**मला निरखितां भवच्चरणकन्यका आपगा--**
**म्हणे, 'अगइ ऐकिलेंहि न कधिं असे पाप!' गा.**
**कर श्रवणिं ठेविते, नुघडि नेत्र, घे भीतिला;**
**न घालिन भिडस मी जरिहि कार्यलोभी, तिला- १०**

कदाचित् देव म्हणेल, कीं, 'अरे, पाप्यांचें तारण करण्यास गंगादि तीर्थें निर्माण केलीं असून तूं माझ्याकडे कां आलास?" अशी कल्पना करून कवि म्हणतो:—

आपल्या चरणांची कन्यका अशी नदी जी गंगा, ती मला पाहून म्हणते, 'अगाई, असें (मोठें) पाप मीं कधीं ऐकलें देखील नाहीं!' ती कानावर हात ठेविते (म्हणजे माझी प्रार्थना ऐकत नाहीं), डोळे उघडीत नाहीं (म्हणजे माझेकडे पाहात देखील नाहीं) व मला पाहून फार भिते; तेव्हां मी जरी कार्यलोभी आहें, म्हणजे माझें

कार्य व्हावें अशी जरी माझी इच्छा आहे, तरी मी तिला आपल्या-साठी भीड घालणार नाहीं.

भवत्+चरण+कन्यका=तुमच्या पायांची मुलगी. गंगा विष्णूच्या पायापासून उद्भवली आहे; कार्यलोभी=स्वकार्यसाधु, 'स्वकार्यसाधु दुसऱ्याला बरें वाटेल न वाटेल, याचा विचार न करितां दुसऱ्याकडून कार्य करून घ्यावयाला पाहातात, परंतु मला या गंगेची दया आल्यामुळें मी तिला भीड घालीत नाहीं,' असा भावार्थ.

सदैव नमितां जरी पद ललाट केलें किणें,
नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें;
नता करुनि मुक्तही म्हणसि 'मी बुडालो रिणें,'
अशा तुज न जो भजे मनुज, धिक् तयाचें जिणें! ११

निरंतर तुझ्या पदांला नमन करितां करितां जरी माझ्या कपा-ळाला घट्टे पडले तरी तुमच्या पदकमळावांचून मला दुसरें कोणी तारणारे नाहीं; (कारण तूं असा आहेस कीं,) तुला जो शरण येतो, त्याला मुक्त करूनही तूं म्हणतोस कीं, 'मी रिणें बुडालों,' म्हणजे माझेवर भक्तजनांचें फार रीण झालें आहे; असा अत्यंत दयाळू जो तूं त्याला जो मनुष्य भजत नाहीं, त्याच्या जिण्याला धिक्कार असो!

किणें=विशेषण ललाट याचें,--घट्यानें युक्त, ज्याचेवर कीण म्हणजे घट्टा पडला आहे, असें "सदैव नमितां जरी किणें ललाट पद केलें;" म्हणजे नेहमीं नमन करितां करितां जरी किणें म्हणजे घट्यानें कपाळ हें आपलें स्थान केलें, असाही अर्थ होईल,

पटुत्व सकलेंन्द्रियीं, मनुजता, सुवंशीं जनी,
द्विजत्वहि दिलें भलें, बहु अलभ्य जें कीं जनीं;
यशःश्रवण-कीर्तनीं रुचि दिली, तरी हा वरा---
म्हणे अधिक द्याच कीं. अखिल याचकीं हावरा. १२

हे देवा, कदाचित् तूं असें म्हणशील, कीं, ह्या मनुष्याला सर्व इंद्रियांचें कुशलत्व दिलें म्हणजे याला सर्व इंद्रियें आपापलीं कामें करण्यांत धडधाकड अशीं दिलीं, मनुष्यदेह दिला, चांगले वंशांत जन्म दिला, जगांत जें लाभण्यास फार कठीण, असें चांगलें द्विजत्व म्हणजे ब्राह्मणजन्म दिला, परमेश्वराचें यश श्रवण करणें व त्याचें कीर्तन करणें या गोष्टींची आवड दिली,—इतकें दिलें असूनही हा 'आणखी वर द्या' असेंच म्हणतो; तेव्हां हा सर्व याचकांमध्यें हावरा म्हणजे ज्याला कधीं संतोष किंवा तृप्ति नाहीं असा आहे.

जनी=जन्म.

**असें न म्हणशील तूं, वरदवत्सल, श्रीकरा;**
**परंतु मज भासले, म्हणुनि जोडितों मी करा;**
**दिले बहु वरे खरे, परि गमे कृपा व्यंग ती;**
**अलंकृति–मती सती मनिं झुरे न जो संगती.** १३

हे वर देणाऱ्यांमध्यें दयाशीला, हे कल्याणकारका प्रभो, असें म्हणणार नाहींस, पण म्हणशील असें वाटलें, म्हणून मीं तसें म्हटलें, याबद्दल मी तुझी हात जोडून क्षमा मागतों; तूं मला पुष्कळ आणि चांगलें असें दिलें आहेस खरें, पण तुझी तेवढी कृपा कमी आहे; म्हणजे मजवर अजून तुझी कृपा झाली नाहीं; अलंकारांनीं भूषित अशी पतिव्रता स्त्री जों पतीची संगति म्हणजे भेट नाहीं, तों मनामध्यें ( पतिविरहामुळें ) झुरत असते; ( त्याप्रमाणें मला येवढें जरी मिळालें आहे, तरी तेवढी कृपा नाहीं, म्हणून माझें मन खेद पावत आहे ).

वरद+वत्सल=वर देणारे जे त्यांत दयाळु;श्रीकर=श्री म्ह० कल्याण तें करणारा; अलंकृति+मत्+ई ( स्त्रीलिंगी प्रत्यय )=अलंकारयुक्त अशी.

**कराल पुरती दया, तरि असो दिलें पावलें;**
**परंतु हरि, एकदां त्वरित दाखवा पावलें;**
**प्रसाद करणें मनीं जरि नसेल, हें आवरा;**
**जया बहु तयास द्या मज कशास ? मी हावरा ! १४**

तुम्ही जर माझेवर पूर्ण दया कराल, तर तुम्हीं जें दिलें आहे, तें पावलें असो, म्हणजे पोचल्यासारखें होईल. परंतु हे हरी, आपलीं पावलें तर एकदां दाखवा; म्हणजे मला दर्शन द्या; ( पुरती दया म्हणजे पावलें दाखविणें हीच ); एवढा प्रसाद जर तुमचे मनांतून मजवर करणें नसेल, तर हेंही दिलेलें आवरा, म्हणजे आपलें परत घ्या, आणि जया बहु म्हणजे ज्याला हें पुष्कळ वाटत असेल, त्याला द्या; मला कशाला उगीच देतां, मी हावरा आहें ! ( माझी कांहीं तृप्ती व्हावयाची नाहीं ).

दिलें व पावलें=भूतकालवाचक कर्माणि विशेषणें, जें ( दिलें ) तें याचीं.

**दिलें, फिरुनि घेतलें, अशि अकीर्ति लोकीं न हो;**
**सुनिर्मळ तुझीं पदें कधि तरी विलोकीन हो;**
**निज--प्रिय-जनांकडे तरीहि दे हवाला; जशी---**
**पडेल समजाविशी तशि करोत; कां लाजशी ? १५**

परंतु दिलेलें परत घेणें हें उचित नाहीं; कारण दिलें आणि परत घेतले, अशी तुमची अपकीर्ति लोकांमध्यें होऊं नये; हे प्रभो तुमची पावले जरी आतां न दिसलीं, तरी तीं कधीं तरी मी पाहीनच; तेव्हां सध्यां माझ्या उद्धाराचें काम तुमचे जे प्रियजन म्हणजे साधू, त्यांचेवर सोंपवा; मग ते माझी समजूत जशी पडेल

तशी घालतील ; अशी व्यवस्था करण्यास लाजतां कां, म्हणजे संकोच कां करतां ?

हो ( पहिल्या ओळींतलें )=होवो; समजाविशी=समजुत.

अहा निपट धृष्ट मी प्रभुवरासि कां लाजशी—
म्हणें;तुज नसो तशी विकृति, भाविकाला जशी;
परंतु अपराध हा गुरु म्हणोनि शिक्षा करीं;
असेंचि धरिली नय-च्युत-दमार्थ दीक्षा करीं. १६

अरेरे, मी अगदींच दांडगा आहें; मी प्रभुश्रेष्ठास ' लाजतोस कां ? , असें म्हणतो; हा लाजण्याचा स्वभाव जसा आम्हा संसारी माणसांचा आहे, तसा तुझा नसावा; ( तुझ्यामध्यें लाजण्याचा गुणच नाहीं, तेव्हां तुला मी ' लाजतोस कां ' असें म्हटलें यांत विशेष कांहीं झालें नाहीं ); तथापि हा अपराध मोठाच, म्हणून मला शिक्षा कर; न्यायापासून च्युत झालेलें, म्हणजे अन्यायमार्गानें जाणारे जे त्यांना शिक्षा करण्याचें व्रतच तूं घेतलेलें आहे.

निपट=अगदीं, केवळ; विकृति--दोष; भाविक--संसारी; नय+च्युत+दम+अर्थ न्यायमार्गापासून घसरलेले जे त्यांना शिक्षा करण्यासाठीं; दीक्षा=व्रत.

सदैव अपराध हे रचितसें, असे कोटि गा,
स्वयेंहि कथितों नसे तिळहि लाज, मी कोटिगा;
अजांडशतकोटि ज्या उदरिं सर्वदा नांदवा,
न त्यांत अवकाश या, स्थळ दिलें तदा कां दवा ? १७

अशा प्रकारचे ( म्हणजे तुला कां लाजतोस म्हटलें असें ) अपराध मी नेहमीं करीत असतों; आणि असें थोडे कां करितों ? कोटयावधि करितों; हें माझें मीच सांगतों; मला तिळभर देखील लाज नाहीं, मी कोडगा आहे; ज्या तुमच्या उदरामध्यें नेहमीं

तुम्ही कोट्यावधि ब्रह्मांडें नांदविता त्यांत या माझ्या अपराधास जागा नाही कां? (नाहीं म्हणत असाल, तर) तेव्हां [कृष्णावतारीं] त्या दावा नळाला स्थळ कां दिलें ?

अजांड- शत-कोटि=परमेश्वराचे उदरीं कोटयावधि ब्रह्मांडें आहेत; एतकीं सर्व व्यापून तो त्यांचे बाहेर उरला आहे; दवा स्थळ कां दिलें. इ०—कृष्णावतारीं गोकुळास अग्नि लागला होता, तो कृष्णानें गिळून टाकून गोकुळाचें रक्षण केलें, अशी कथा आहे.

तुझ्या जिरविले बहू प्रणतमंतु पोटें, पण—
त्यजी मदपराध, हें मजकडेचि खोटेंपण;
दवाग्नि जठरीं अतिक्षुधित, त्यास हें अन्न द्या,
वितृष्ण करिती श्रितां तुमाचिया दयासन्नद्या. १८

तुझ्या पोटानें पुष्कळ शरण आलेल्या लोकांचे अपराध जिरविले असून माझेच अपराध तुझें पोट सोडतें, म्हणजे जिरवीत नाहीं, यांत वास्तविक दोष माझाच आहे; तुम्ही जो दावाग्नि गिळला आहे, त्याला तुमच्या पोटामध्यें फार भूक लागली आहे; त्याला हें [ माझे अपराध—रूप ] अन्न द्या; तुमच्या दयारूप उत्तम नद्या तुमचे जे आश्रित आहेत, त्यांची तहान नाहींशी करितात.

प्रतण-मंतु=शरण आलेल्यांचे अपराध. वितृष्ण=विगत म्हणजे गेली आहे. तृष्णा ज्यांची बहु० स०

न होय कवणाहि, तें तुमचियाचि लीलालसें;
पदें चरित दाविजे, त्रिजगदब्जकीलालसें;
मदुद्धरण मात्र कां जड तुम्हां दिसे ? वारिती—
स्वकव्यसन मर्त्यही, न करितीच सेवा रिती. १९

जें दुसरें कोणासही होणार नाहीं अशा प्रकारचें, त्रिभुवनरूप कमळास उदकाप्रमाणें असणारें, असें चरित्र लीलेनें अलस म्हणजे मंद अशा तुमच्या पायानें दाखविलें, ( म्हणजे ज्या गोष्टी दुसऱ्या कोणाच्यानें होणार नाहींत, त्या तुम्हीं सहज करून दाखविल्या आहेत; असें असून ) माझा उद्धार करणें मात्र तुम्हांस जड कां वाटतें ? माणसें सुद्धां आपलें म्हटलेल्या लोकांची संकटें दूर करितात, व कोणाची सेवा फुकट जाऊं देत नाहींत. ( मग तूं तर प्रभु असून माझी सेवा कशी व्यर्थ जाऊं देतोस, असा अर्थ ).

लीलालस=लीलेनें आळशी, म्हणजे एकादी गोष्ट आळसत आळसत करणारे, चपळ नव्हत; तुझे पाय चपळ नसतांही त्यांनीं मोठालीं चरित्रे केलीं आहेत. म्हणजे तुझा हा सहज खेळ आहे. दाविजे=हें जुन्या तऱ्हेचें 'ज 'प्रत्यय लागून झालेलें वर्तमान काळाचें कर्मणि रूप आहे; ' पदें चरित दाविजे. ' ='पायानें चरित दाखविलें आहे;' ( पहा प्रौढबोध व्याकरण क० २१४ त्रिजगत् +अब्ज+कीलाल=त्रिभुवनरूप कमळास पाण्यासारखें,म्हणजे त्रिभुवनास आधारभूत.

दयाब्द, वळशील तूं, तरि न चातकां सेवकां—
उणें किमपि; भाविकां उबगशील तूं देव कां ?
अनन्यगतिकां जनां निरखितांचि सोपद्रवा,
तुझेंचि, करुणार्णवा मन धरी उमोप द्रवा. २०

हे दयेच्या मेघा, तूं जर आमचे बाजूला वळशील, तर आम्ही तुझे सेवकरूपी जे चातक, त्यांना कांहीं उणें नाहीं; तूं ( असा जो दयाळू देव ) तो आपल्या भाविक भक्तांस कां कंटाळशील ? ज्याला दुसरें कांहीं त्राण नाहीं, असा कोणी जन संकटांत पडलेला पाहून, हे करुणेच्या सागरा देवा, तुझ्याच मनांत पुष्कळ दया उत्पन्न होते.

चातकां सेवकां इ०--चातक पक्ष्यास स्वतः होऊन पाणी पितां येत नाहीं; मेघ त्याचे डोकीवर येऊन वर्षाव करील, तेव्हां त्यास पाणी मिळतें अशी याप्क्षया-बद्दल समजूत आहे; उबगणें=कंटाळणें; अन्+अन्य+गति+क=नाहीं अन्य गति ज्यांना असे. बहु० स०

कळी करि सुनिर्मळीं परम उग्र दावा नळीं,
तयांत अविशुद्ध मी, शलभ जेंवि दावानळीं;
व्रणार्तपशुच्या शिरावरि वनीं उभे वायसे—
स्मरादिरिपु मन्मनीं; अहि न काळ भेका कसे ! २१

कलीनें अत्यंत पुण्यवान जो नळराजा त्याच्याशींही मोठा भयंकर द्वेष केला; तशांत मी पापी ज्याप्रमाणें वणव्यामध्यें टोळ सापडावा, अशा स्थितींत आहें (कळीच्या सपाट्यांत नळराजा मोठा तरी होता, माझी वणव्यामध्यें सापडलेल्या टोळासारखी स्थिती आहे); अरण्यांत जखमेनें पीडित झालेल्या पशूच्या डोक्यावर जसे कावळे (ती जखम टोंचण्यास) उभे असतात, तसे कामक्रोधादि शत्रु माझे मनांत मला पिडा करण्यास तयार उभे आहेत; सर्प बेडकाला काळासारखे कसे वाटणार नाहींत ?

कली=पापाची देवता; नळ=नळराजाला दमयंती मिळाली याबद्दल कलीला राग येऊन, त्याने संधि साधून नळाचे मनांत प्रवेश केला, व त्याचे मन भ्रष्ट करून त्याला द्यूत खेळावयास लावलें, व त्यामुळें नळावर अनेक संकटें आलीं; व्रणार्त=येथें - ' व्रणार्थ ' असा पाठ आहे, त्याचा अर्थ जखम होईल तीसाठीं; म्हणजे जखम होईल केव्हां आणि टोंचूं केव्हां, असे टपलेले आहेत.

तरेन तुमच्या बळें भवमहानदी नाविका,
तुम्हीच मग आतरास्तव मला सुदीना विका;
असे विदित वासही मज सदाश्रमींचा, करा—
दया, गुण महा; सवे मज सदा श्रमीं चाकरा. २२

हे नाविका परमेश्वरा, तुमच्या साह्यानें ही संसाररूपी महानदी तरून जाईन; मग उतारासाठीं ( माझे जवळ कांहीं नाहीं म्हणून ) तुम्ही मला भिकाऱ्याला विकून टाका; ( मी जरी भिकारी आहे तरी ) मला सांधूच्या घरीं कसें राहावें याची माहिती आहे, व मी जो सेवक, त्या मला नेहमीं श्रम करण्याची संवय आहे, (यासाठीं मला विकत घेणारा कोणी मिळण्यास कठीण पडणार नाहीं ). तेव्हां माझ्यावर दया करा, व माझेमध्यें काय गूण आहेत, ते पाहा.

आतर=उतार, होडीचें भाडें; सदाश्रमींचा=सत्+आश्रमीं+चा; सदाश्रमीं अशी सप्तमी होऊन, तें स्थलवाचकनाम झालें आहे, व त्यास ' चा ' हा प्रत्यय लागला आहे. ( प्रौढबोध व्या० क० ३८२ पहा. ) ( ६ )

**धना, परिजना, घरीं तुमचिया उणें कायसें ?**
**न लाभ मणिहेमभूपतिस जोडिल्या आयसें;**
**परि प्रभूहि संग्रहींसकलवस्तुला ठेविती,**
**गुणा न म्हणतां उणा अधिक, आदरें सेविती २३**

तूं म्हणशील कीं ' तुला विकून धन घेऊन, किंवा तुलाच नोकरला ठेवून मला तरी काय करावयाचें आहे ? ' तर खरेंच; तुझ्या घरीं पैशाला व चाकरांला काय तोटा आहे ? (तुझ्याकडे कमी आहे, म्हणून मी तुझ्याकडे आलों असें नाहीं ); लोखंडानें ज्याचे घरीं पुष्कळ रत्नें व सुवर्ण आहे अशा राजाचा आश्रय केला, तर त्या राजाला त्यापासून कांहीं लाभ नाहीं; ( त्याप्रमाणें वास्तविक माझ्यापासून तुला लाभ नाहीं ); तथापि राजेसुद्धां सर्व प्रकारच्या वस्तू आपल्या संग्रहीं ठेवितात; व अमक्या वस्तूचा गूण जास्त, अमकीचा कमी, असें न म्हणतां मोठ्या आदरानें त्यांचा ( वेळ येईल तेव्हां ) उपयोग करून घेतात.

मणि+हेम+भूपती=ज्याचे जवळ रत्नें व सुवर्ण आहे, असा राजा; मणिहेमांचा भूपती, षष्ठितत्पुरुष स० ;

**दिसें म्हणुनि शाश्वतप्रकृति रंक मी काय ? हो !**
**प्रसन्न तुमचे बरें मजवरी प्रभो, पाय हो !**
**क्षण त्यजुनि इंदिराबृहदुरोजसंगा, धरा—**
**शिरीं पद, मिळो सखा सम-सुशील गंगाधरा. २४**

अन्वयः—अहो, मी दिसें म्हणूनि शाश्वतप्रकृतिरंक [आहें] काय ? प्रभो, मजवरी तुमचे पाय प्रसन्न हो बरें ! क्षण इंदिराबृहदुरोजसंगा त्यजुनी [माझ्या] शिरीं पद धरा; सुशील गंगाधरासम सखा मिळो !

हे प्रभो, मी आपला दीन दिसतों, म्हणून नेहमींचाच असा दीन राहाणारा आहें काय? मजवर तुमचे पाय प्रसन्न तर होऊं द्या बरें ( मग काय चमत्कार होतो पाहा); लक्ष्मीच्या पुष्ट स्तनावरचा आपला पाय काढून क्षणभर माझ्या डोक्यावर धरा, म्हणजे मग सुशील जो शंकर त्यासारखा मित्र तुम्हांस प्राप्त होईल; म्हणजे तुम्ही माझ्या शिरीं पाय धरिला असतां मी क्षणांत शंकरासारखा होऊन जाईन.

इंदिरा+बृहद्+उरोज+संगा=लक्ष्मी निरंतर विष्णूचें पादसेवन करीत असते व त्यावेळीं विष्णूचे पाय तिच्या स्तनावर धरलेले असतात. घटकाभर जरी त्या मृदुस्थानावरचे पाय काढून माझ्या कठीण डोक्यावर धरावे लागले तरी धरून पाहा.

**प्रभुस्तुति न ठाउकी, परि तिच्या महाकामुका,**
**मला कृपण मारितो बहु सकाम हाका मुका—**
**म्हणा मनिं असें; कसें प्रथम नीट ये लेंकरा ?**
**हळू हळू पदु, स्वयें सुपाथिं लावियेलें करा. २५**

परमेश्वराची स्तुती कशी करावी, हें मला ठाऊक नाहीं; तथापि ती ज्यास फार आवडते अशा परमेश्वरा, मुका म्हणजे ज्यास चांगलेंसें बोलतां येत नाहीं, कृपण म्हणजे स्तुती करण्यास असमर्थ आणि फार इच्छा धरणारा, असा मी तुला हाका मारीत आहें असें मनांत समज; लहान मुलाला प्रथमच नीट कसें येईल ? यासाठीं तुम्ही स्वतःच मला हळू हळू हुषार करा, आणि सन्मार्गास लावून द्या.

कामुक=इच्छा करणारा, ज्याला ( कांहीं ) आवडतें असा; कृपण=गरीब, असमर्थ; पंगू.

जनीं तरी असें असे, शिशुहि जे मुखें वर्णवी,
पिता पिउनि तें भुले, मधुरता सुखें वर्णवी;
मना जरि नये, गुरुक्तहि म्हणे कटुप्रायशा ;
दयानिधि, तुम्हांपुढें जनकथा अशा कायशा ? २६

जगांतील रीत तरी अशीच आहे, कीं लहान मुलाचे तोंडांतून जीं अक्षरें निघतात, तीं श्रवण करून बाप कौतुक मानितो, व त्यांची मधुरता आनंदानें ( लोकांकडून ) वर्णवितो—(म्हणजे लोकांनीं तो शब्द गोड आहे असें म्हटलें असतां त्यास सुख वाटतें ); मूल बापाला वेडे वांकडे शब्दही बोलतें; तें कटू बोलणें जरी प्रसंगीं बापाच्या मनास आलें नाहीं, तरी त्याला ' गुरूक्त ' म्हणजे ' कसें उत्तम बोलणें ! ' असें तो म्हणतो, व त्याची तारीफच करितो; हे दयानिधे देवा, मनुष्यांच्या कथा तुझ्यापुढें अशा काय सांगावयाच्या आहेत ?

गुरूक्त=उत्तम प्रतीचे शब्द; कटुप्रायशा=कटुप्राय+अशा ( बोलण्यास )=प्रायः कटू अशा शब्दांस; कायशा=किती योग्यतेच्या.

**अतर्क्य महिमा तुझा, गुणहि फार, बा, हे, विधी—**
**श्रुतिज्ञहि म्हणे सदा, स्तविल आमुची केंवि धी?**
**तशी जन यथामती स्तवुनि जाहले सन्मती;**
**स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधीं जन्मती? २७**

बा, हे परमेश्वरा, तुझें थोरपण ज्याची कल्पनाही कारितां येणार नाहीं असें आहे, व गूणही फार आहेत; असें वेद जाणणारा ब्रह्मदेवही म्हणतो, मग आम्हीं आपल्या बुद्धीनें तुझें कसें स्तवन करणार? तथापि लोक आपल्या मतीप्रमाणें ( म्हणजे त्यांस जसें आलें तसें ) तुझें स्तवन करून चांगल्या बुद्धीचे झाले आहेत, ( म्हणजे तुझें स्तवन केल्यानें त्यांचीं मनें शुद्ध झालीं आहेत ); तुझें स्तवन करण्यास तुझ्यासारखे कवी पाहिजेत, ते कधीं उत्पन्न होणार आहेत?

विधी=ब्रह्मदेव; श्रुतिज्ञ=वेद जाणणारा; वेद प्रथमतः ब्रह्मदेवापासूनच सर्वांस प्राप्त झाले; सत+मती चांगली आहे मती ज्यांची, असे; बहु० स०

**निजस्तुति तुम्हां रुचे; स्तविति त्यां वरें तर्पितां,**
**नमस्कृतिपरां वरें स्वधन सर्वही आर्पितां;**
**स्वभाव तुमचा असा विदित जाहला याचकां;**
**करूं स्तव जसा–तसा; फळ नव्हे जना याच कां? २८**

तुम्हांस तुमची स्तुती आवडते, व जे स्तुति करतात त्यांस तुम्ही वर देऊन संतुष्ट कारितां; व तुम्हांस जे शरण येतात, त्यांस तुमचें जें चांगलें स्वधन ( म्ह० मोक्ष ) तें अर्पण कारितां; हा तुमचा स्वभाव याचना करणाऱ्या आमच्या सारख्यांस ठाऊक झाला आहे व आम्हीं, जरी नीट कारितां येत नाहीं तरी, कसाबसा तुझें स्तवन कारितों; मग याच जनास (म्हणजे मलाच) फळ कां मिळत नाहीं?

वरें=वरानें, वर देऊन; नमस्कृतिपर=नमस्कार करणारे; जसा—तसा=कसातरी, वाईट-बरा, जसा येतो तसा.

**तुम्ही परम चांगले, बहुसमर्थ दाते; असें—**
**सुदीन जन मी, तुम्हां शरण आजि आलों असें;**
**पुन्हाहि म्हणतों, बरें श्रवण हें करा वास्तव;**
**समक्ष किति आपला सकललोकराया, स्तव ? २९**

तुम्ही फार चांगले, मोठे समर्थ असे दाते; व मी फार गरीब असा मनुष्य असून तुम्हास आज शरण आलों आहें; हें मी पुनः (वारंवार ) सांगतों, यासाठीं नीट ऐकून घ्या; कारण, हे सर्व जगाच्या नायका, तुझ्या समक्ष ( तुझे तोंडावर ) तुझी स्तुती करावी तरी किती ?

**किती श्रवण झांकिती प्रभुहि, काय ते पोळती;**
**पुसाल जरि कोण ते, पदरजीं तुझ्या लोळती;**
**बरें तुजचि सोसवे स्तवन, कृत्तिवासा गरा—**
**न पी तरि कसें घडे ? हितकरा, दयासागरा. ३०**

हे हितकरा दयासागरा देवा, मोठे मोठेही लोक, कोणी त्यांची स्तुती केली असतां कानावर हात ठेवितात ( म्हणजे स्वस्तुती त्यांस आवडत नाहीं; जसे काय ते पोळतात म्हणजे आपल्यास कोणी डाग दिला असें त्यांस वाटतें ); हे कोण म्हणून विचाराल, तर जे तुझ्या पायांच्या धूळींत लोळतात तेच, ( म्हणजे तुझे भक्त किंवा साधु ); स्तवन हें तुलाच बरें आवडतें, ( आणि हें योग्यच आहे; उदाहरणार्थ— ) शंकर जर विष न पिते तर काय स्थिती झाली असती ?

कृत्ति-वासा=कृत्ति म्ह० व्याघ्रचर्म तेंच आहे वासस् म्ह० वस्त्र ज्याचें, असा शंकर ( बहु० स० ); शंकर व्याघ्रचर्म परिधान करितात. गरा न पी-इत्यादि समुद्रमंथनाचे वेळीं भयंकर विष उत्पन्न होऊन त्यानें जग जळूं लागलें, तेव्हां तें विष शंकर प्याले, म्हणून बरें झालें.

गमो मधुर हें विषस्तवन, सेवितां माजवी,
करी मलिन सद्यशोमुख, हलाहला लाजवी;
हरापरिस तूं बरा, प्रभुवरा, सदा जो पिशी;
असा रस समर्पि,त्या अमृत आपुलें ओपिशी. ३१

हे प्रभुवरा, हें स्तवनरूपीं विष ( तुम्हांस ) गोड वाटो, पण दुसऱ्या कोणी सेवन केलें असतां माज आणितें; सद्यश म्हणजे उत्तम कीर्तीरूप जें मुख त्यास काळिमा आणितें; ( म्हणजे त्यापासून कीर्तीला बट्टा लागतो); हें स्तवनरूपी वीष जालीम वीष जें हलाहल, त्यास ही लाजवितें. असलें वीष तूं जो नेहमीं पितोस, तो शंकरापेक्षां श्रेष्ठ आहेस, ( कारण शंकर हलाहल एकदांच प्यालें ); आणि अशा प्रकारचा रस तुला जे अर्पण करितात, त्यास तूं आपलें अमृत ( म्हणजे मोक्ष ) देतोस.

हलाहल=देवदैत्यांनीं समुद्रमंथन केलें असतां विष उत्पन्न झालें तें हलाहल त्याचि योगानें त्रिभुवन जळूं लागलें, तेव्हां शंकरांनीं तें प्राशन केलें.

कवीश्वरमनः पयोनिधिसुतास्तुतीच्या पते,
भले न वरिती स्तुतीप्रति, न जोडिती पाप ते;
गळां पडति ज्यांचिया तवगुणैकदेशभ्रमें,
तिहीं तुजचि दावितां, भजति, बा, तुला संभ्रमें, ३२

कविश्रेष्ठ जो त्यानें मन हाच कोणी क्षीर—समुद्र त्याची सुता ( क्षीर समुद्राची कन्या जी लक्ष्मी, तिच्यासारखी ) जी स्तुती

तिच्या पते, ( म्हणजे तिचा स्वीकार करणाऱ्या परमेश्वरा ), भले जे आहेत, ते स्तुतीचा स्वीकार करीत नाहींत, ते पाप जोडीत नाहींत, ( कारण स्वस्तुती निमुटपणें ऐकणें हें पाप आहे ); परंतु तुझ्या गुणांसारखे गूण त्यांचयामध्यें असल्यामुळें चुकून त्यांच्या गळयांत ती स्तुती पडते; तेव्हां त्यांनीं तुला दाखवून दिलें असतां लज्जा पावून ( आपण चुकून भलत्याकडे गेल्याबद्दल ओशाळ होऊन ) तुला भजते.

कवि+ईश्वर+मनः+पयोनिधि+सुता+स्तुति=कवींमध्यें श्रेष्ठ जो त्यांचें मन हाच कोणी पयोनिधि त्यापासून उत्पन्न झालेली स्तुती, म्हणजे कविश्रेष्ठानें रचिलेली स्तुतीपर कविता. तवगुणैकदेशभ्रम=तव+गुण+एकदेश+भ्रम=तुझ्या गुणांच्या सारखेपणाच्या ( एकदेश=सादृश्य ) योगानें झालेल्या भ्रमानें ' पडति, ' भजति= ही तृतीय पुरुषाचीं एकवचनें आहेत; यांचा कर्ता ' स्तुती, ' गळां पडते ' व ' तुला भजते '.

म्हणोनि कवितासुता तुज समर्पितों; साजरी—
नसे बहुतशी गुणी, कनकपीतवासा, जरी—
तरी न इतरा वरी, हरि, करी इला किंकरी,
मयूर हि निजात्मजागृहत्रिमुक्त, जैसा करी. ३३

हे कनक-पीत वासा हरी ( सुवर्णासारखें पिंवळें आहे वस्त्र ज्याचें, अशा देवा ), यासाठीं ही माझी कवितारूप कन्या मी तुला अर्पण करितों; ही सुरेख नाहीं, व फारशी गुणीही नाहीं, तथापि ती तुझ्यावांचून दुसऱ्या कोणासही वरीत नाहीं; तेव्हां हिला आपली दासी कर, आणि मीं जो मयूर कवी, त्याला त्या गजेंद्राप्रमाणें आपल्या कन्येच्या काळजीरूप नक्रापासून मुक्त कर; ( म्हणजे तिचें एकदां लग्न झालें कीं काळजींतून मुक्त होईन, असा अर्थ ).

निजात्मजा-ग्रह-विमुक्त, जैसा करी=गजेंद्र नामक हत्तीं विष्णूचा भक्त होता, तो एकदां नदीवर गेला असतां नक्रानें त्याचा पाय धरिला, तेव्हां विष्णूनें येऊन त्यास मुक्त केलें; त्याप्रमाणें माझ्या मुलीच्या लग्नाबद्दल मला फार काळजी आहे, ही काळजी नक्राप्रमाणेंच होय; तेव्हां या कन्येचा तुम्ही स्वीकार केला, म्हणजे मी काळजीरूप नक्रापासून मुक्त केल्याप्रमाणेंच होईन.

स्मरोनि कृतमंतुला, न कवितावधू-स्वीकृती—
कराल, तरि आयका प्रभु, खराच मी दुष्कृती;
नमस्कृतिपुरःसर स्वकृति अर्पितो आजि, ती—
दिली रविसखें तुम्हां जशी नमोनि सत्राजिती. ३४

मी जे अपराध केलें आहेत' ते आठवून जर तुम्ही माझ्या कवितारूप कन्येचा स्वीकार न कराल, तर हे प्रभो, ऐका, मी खराच दुर्दैवी म्हणावयाचा; रवीचा भक्त जो सत्राजित ( तो ही अपराधी असून ) त्यानें जशी आपली मुलगी सत्यभामा तुम्हांस शरण येऊन दिली, त्या प्रमाणें मी ही आपली कवितारूपी कन्या आज तुम्हांस नमस्कारपूर्वक देत आहे.

दुष्कृती=वाईट कृती ज्याची असा म्हणजे अपराधी, किंवा दुर्दैवा; येथें दुर्दैवा असा अर्थ घेणें चांगलें; रविसखे=या सत्राजितानें अगोदर कृष्णाचा द्वेष करून त्याचेवर चोरीचाही आळ आणिला होता, तथापि त्याची मुलगी कृष्णानें आपली बायको केली.

' पिता खळ, परंतु ती गुणवती सती चांगली, '
म्हणोनि मज आपुल्या भजनिं लावणें लागलीं,
म्हणाल, तरि तत्सुता काशि ? तुम्हांसवें भांडगा—-
अहर्निशि हि भांडला त्रिनवरात्र जो दांडगा. ३५

तुम्ही म्हणाल, कीं " तिचा बाप जरी दुष्ट होता, तरी ती सत्यभामा गुणवती व पतिव्रता अशी चांगली होती, म्हणून तिचा

आपल्या सेवेसाठीं आम्हांस स्वीकार करावा लागला; " तर तें एक असो; पण जो दांडगा भांडखोर तुम्हांजवळ सत्तावीस दिवस अहोरात्र सारखा भांडला असा जो जांबवान, त्याची मुलगी जी जांबवती, ती कशी काय होती ? ( म्हणजे अगोदरच जांबवान जातीचा अस्वल, त्यांत सत्तावीस दिवस तुमचे जवळ भांडला, आणि ती तर अस्वली, अर्थात् कुरूप असणारच; तेव्हां त्याचेपेक्षां मी कांहीं जास्त अपराधी नाहीं, व माझी कविता-सुताही तिच्यापेक्षां वाईट नाहीं, असा अर्थ )

सत्राजिताचा स्यमंतकमणी, जो चोरल्याबद्दल कृष्णावर आळ आला होता, तो जांबवान नामक अस्वल होता त्याचे जवळ सांपडला. त्याच्याशीं युद्ध करून तो कृष्णानें सोडवून आणिला व त्याची मुलगी जांबवती हिला वरिलें, असा कथासंबंध या श्लोकांत आहे.

तिलाहि बरवी म्हणा, उचितहोय, तोषाकरें—
असेल सजली यथारुचि तयीं स्वयोषा करें,
जशी पदरजें शिला; परि असे नव्हे शापिली—
धवें, हरिमनोहराकृति सती अघें व्यापिली. ३६

ती जी जांबवती, तिला ही पाहिजे तर चांगली म्हणा; तसें म्हणणें तुम्हांस योग्यच आहे; कारण आनंदाची खाणच असा जो तुमचा हात, त्या हातानें तुम्हीं ती आपली बायको जशी पाहिजे तशी सजवून घेतली असेल; ( कारण अशा रीतीनें वाईट पदार्थ चांगला करून घेण्याची तुमची चाल आहे ); याला उदाहरण, तुम्ही जशी आपल्या पायाच्या धुळीनें शिळेची स्त्री करून घेतली, तशी; परंतु ही माझी कविता, इंद्राच्या मनाचें हरण करणारी

अशी जिची सुंदर आकृति होती, व जी पापी असून जिला तिच्या नवऱ्यानें शाप दिला होता, अशा त्या अहिल्येसारखी नाहीं.

तोष+आकार=आनंदाचें स्थान; यथारुचि=आवडीप्रमाणें, अव्ययीभावसमास: हरीं+मनोहरा+आकृति=इंद्राचें मन हरण करणारी आहे आकृती जीची; या केकेंत आहिल्येच्या कथेचा संबंध आहे. अहिल्या ही गौतम ऋषीची बायको. हिला इंद्रानें फसवून तिच्या पातिव्रत्याचा भंग केला. तेव्हां गौतमानें तिला ' शिळा हो ' असा शाप दिला. पुढें रामाच्या पायाच्या धुळीनें ती शापमुक्त झाली.

भलें स्मरण जाहलें समयिं; कंसदासी करें—
कशी उजरली, समुज्ज्वलदयासुधासीकरें ?
तुम्हां स्वरिपुची तशी बटिक आवडे, मत्कृती—
नको, न सजवे, असा बहुत काय मी दुष्कृती ? ३७

मला आणखी एका गोष्टीचें योग्य समयीं चांगलें स्मरण झालें:—तुम्ही ती कंसाची बटीक ( कुब्जा ) अतिनिर्मळ अशा करुणामृताची वृष्टी ज्यापासून होते, अशा तुमच्या हातांनें कशी बरें सुरूप करून घेतली ? तुम्हास तुमच्या शत्रूची अशा प्रकारची ( वेडी-वाकडी ) दासी आवडते आणि माझी कृती नको,—ती कांहीं तुमच्यानें गोड करून घेववत नाहीं,—ती अशा प्रकारचा मी मोठा अपराधी आहें कीं काय ?

कंसदासी--कंसाची कुब्जा म्हणून एक कुरूप दासी होती. तिचें शरीर तीन ठिकाणीं वक्र होतें. तरी कृष्णाला शरण आली तेव्हां तिला कृष्णानें हस्तस्पर्शानें नीट केलें. समुज्ज्वल+दया+सुधासीकर=अति स्वच्छ अशा, दयामृताची वृष्टी करणारा असा, कर; समुज्ज्वल०—इत्यादि, हें कर याचें विशेषण दुष्कृती=पापी, अपराधी.

जशी पृथुकतंदुलप्रसृति आप्तकामा, तशी—
रुचो कृति; सभाग्य तूं सुनय आप्त कां मातशी ?

**कण्या विदुरमंदिरीं म्हणति साधु आस्वादिल्या;**
**खरें जरि, कशातुज प्रभुसि आपुल्या स्वा दिल्या ! ३८**

आप्तकाम, म्हणजे ज्याची इच्छा नेहमीं तृप्त असते, त्या तुला [ त्यावेळीं ] ज्याप्रमाणें पोह्यांच्या कणांनीं भरलेली ओंजळ ( आवडली ), त्याप्रमाणें ही माझी कृती आवडो; तूं भाग्यशाली आहेस, नीतिमान् आहेस व हितकर्ता आहेस; मग तूं माजशील कां ? म्हणजे माझ्या देणगीचा बेपर्वाईनें तिरस्कार कां करशील ? साधू म्हणतात, कीं तुम्ही एकदां विदुराच्या घरीं कण्या खाल्ल्या; हें जर खरें असेल, तर तूं जो त्या विदुराचा स्व म्हणजे केवळ आत्माच, त्या तुला त्यानें अशा कण्या कशा दिल्या ? ( सारांश तुला भक्ताची अल्प देणगीही गोड करून घेण्याची संवय आहे, असा भाव ).

पृथुक इ०=हे सुदामदेवाचे पोहे. प्रसृति=ओंजळ. आप्तकाम=आप्त म्हणजे तृप्त आहेत काम म्ह० इच्छा ज्याच्या, असा; बहु० स० का मातशी, इ०—कोणी खाण्याचे पदार्थ टाकूं लागला असतां त्याला ' माजला ' असें म्हणतात. तेव्हां इतकाच अर्थ येथें आहे; यापेक्षां दांडगेपणाचा अर्थ घ्यावयाचा नाहीं.

**जिणे रस पहावया प्रशिथिलीं रदीं चाविलीं,**
**सुवास हि कळावया प्रथम नासिकीं लाविलीं,**
**तुम्हांसि शबरी तशी बदरिकाफळे दे जुनीं;**
**कथा अशि असो, पहा स्वचरितें तुम्ही मेजुनी.**

दुसरें उदाहरण शबरीचें घ्या; प्रथमतः चव पाहण्यासाठीं जी सैल दातांनीं ( म्हातारपणामुळें शिथिल झालेल्या दातांनीं, किंवा

फार दांत लागूं नयेत अशा रीतीनें, पोरें म्हणतात त्याप्रमाणें चिमणीच्या दातांनीं ) चावली, व त्यांचा सुवास कळण्यासाठीं नाकाला लावून हुंगली, अशा प्रकारचीं शिळीं बोरें त्या शबरीनें तुह्मांस दिलीं; ही एक कथा पाहिजे तर राहूं द्या; पण अशा प्रकारच्या आणखी पुष्कळ कथा आहेत, मोजून पहा. ( म्हणजे ही एकच शी काय, असल्या कथांना तुमच्या चरित्रांत तोटा नाहीं )

प्र-शिथिल= फार हालणारें, किंवा अगदीं हलके ( दांत ). शबरी म्हणजे एक भिल्लिण होती, तिनें अरण्यांत राम व लक्ष्मण यांचा आदर करून मोठ्या प्रेमभावानें त्यांस बोरें खावयास दिलीं, अशी कथा आहे.शबरी हें सामान्यनाम आहे. विशेषनाम नव्हे.

प्रभो ! शरण आलियावरि न व्हा कधीं वांकडे,  
म्हणोनि इतुकेचि हें स्वहितकृत्य जीवाकडे  
प्रसाद करितां नसे पळ विलंब बापा, खरे;  
घनांबु न पडे मुखीं उघाडल्या विना पांखरें. ४०

हे प्रभो, आम्ही तुला शरण आलों, म्हणजे मग तुम्ही प्रतिकूळ असत नाहीं; यासाठीं जीवांच्या हातीं स्वहिताची गोष्ट म्हणून जी करावयाची आहे; ती एवढीच ( म्हणजे तुला शरण जाणें हीच ) आहे; हे बापा परमेश्वरा, ( आम्ही शरण आल्यावर ) प्रसाद करण्यास तुम्हाला पळभरही उशीर लागत नाहीं, हें खरें; पण चातक पांखरूं जें आहे, त्यानें तोंड उघडल्यावांचून मेघांतलें उदक कांहीं त्याचे तोंडांत पडत नाहीं. ( कवी म्हणतो, कीं ज्याप्रमाणें मेघ पुष्कळ येऊनही पांखरानें तोंड उघडलें तरच त्याच्या तोंडांत पाणी पडेल, त्याचप्रमाणें तूं एवढा कृपाळू आहेस, तरी

आम्ही शरण आलों तरच कृपा करणार; नाहीं तर कोठून करशील ? )

स्वहित-कृत्य=आपल्या हिताची गोष्ट. प्रसाद करितां=प्रसाद करण्यामध्यें. पांखरें=घातकानें.

शिवे न तुझिया पदा अदयताख्य दोष क्षण;
प्रभो, चुकतसों तरी करिसि तूंचि संरक्षण;
नसेचि शरणागती घडालि सत्य अद्यापि ती;
रुचे विषय, ज्यां मिळे अमृत ते न मद्या पिती. ४१

हे प्रभो, अदयता नांवाचा जो दोष म्हणतात, तो तुझ्या पायाला शिवतही नाहीं ( म्हणजे तुझ्या ठिकाणीं आदयता सांपडणारही नाहीं); आम्ही जरी ( नेहमीं ) चुकत असतों, तरी तूंच आमचें संरक्षण करितोस; ( असें असून आमची अशी स्थिती कां, तर ) आमचे हातून शरण जाण्याचें काम अजून खरें म्हणजे योग्य रीतीचें असें घडलें नाहीं, (म्हणजे आम्ही अजून तुझे खरे भक्त बनलों नाहीं; कशावरून तर ) आम्हांस विषय ( म्हणजे संसारसुखें ) आवडतात; ज्यांस अमृत मिळेल ते मद्य पिणार नाहींत ( त्याप्रमाणें जे तुला शरण जाऊन तुझी कृपा संपादितात, त्यांना मग विषय रुचणार नाहींत ).

अदयताख्य=अदयता ही आहे आख्या ज्याची म्ह० नांव ज्याचें, असा दोष बहु० स०. शरण+आगती=शरण येणें.

विपाक न गणोनि म्यां प्रकट आपुल्या घातकें—
कळोनि अगितें बळें विविध जोडिलीं पातकें;

‘ क्षमस्व भगवन्नजामिलसखोऽस्मि ’ ऐसें; तुला—
म्हणें नमुनियां सुदुस्तरविपन्नदीसेतुला. ४२

केवळ आपलाच घात करणारा असा जो मी, त्यानें समजून उमजून, व परिणामास न जुमानतां, मुद्दाम पुष्कळ पातकें केलीं; “ भगवंता, मी अजामिळाचा सखा ( म्हणजे त्याच्यासारखा महा-पातकी ) आहें, मला क्षमा कर. ” असें तरण्यास कठीण अशी जी विपत्तिरूप नदी, तिचा सेतू जो तूं, त्या तुला मी म्हणत आहें.

विपाक=परिणाम. ‘ क्षमस्व भगवन् अजामिलसखः अस्मि=’ हें संस्कृत वाक्य आहे. ‘ हे भगवन् क्षमा कर; मी अजामिळाचा सखा आहे. ’ अर्थात् त्याच्या-प्रमाणें मलाही उद्धर. सु+दुस्तर+विपत्+नदी+सेतु=अत्यंत दुस्तर अशी जी विपत्तिरूप नदी तिचा सेतू.

नव्हे अनृत, सत्य, तें; अचल ऊचलीला करें—
तुवां हरिमदापहें, बृहदुदारलीलाकरें;
समुद्धरसि एकटा जरि जडासि या कर्दमीं
म्हणेन भुवनत्रयीं तरि तुला भला मर्द मी. ४३

पूर्वीं तुम्हीं पाप्यांचा उद्धार केला असेल, पण माझ्यासारख्या मोठया पाप्याचा उद्धार केलात, तर तुम्हीं पराक्रमी खरे, अशा अभिप्रायानें कवी म्हणतो:—

हे प्रभो, तूं जो इंद्राचा गर्व हरण करणारा, त्या त्वां फार उदार ज्या लीला, त्यांची खाण म्हणजे उगमस्थान ( म्हणजे ज्याकडून उदारपणाच्या अनेक लीला घडल्या आहेत ) असा जो तुझा हात, त्याच्या योगानें पर्वत उचलला हें खोटें नव्हे, खरेंच

आहे; परंतु ( मी पापी त्या गोवर्धनपर्वतापेक्षांही जड आहें, तेव्हां ) हा जो मी पापी, ह्या मला या पापरूपी चिखलांतून जर एकटाच उद्धरशील, तर मग या त्रिभुवनांत तूं मोठा शूर आहेस, असें मी म्हणेन.

अचल ऊचलीला=इंद्रानें रागावून गोकुळावर भयंकर पर्जन्यवृष्टी करण्यास आरंभ केला, तेव्हां कृष्णानें गोवर्धन नावांचा पर्वत छत्रीसारखा धरून गोकुळाचें रक्षण केलें व अशा रीतीनें इंद्राचा गर्व हरण केला. बृहत्+उदार+लीला+आकर=फार उदार अशा लीलेचें स्थान, ( असा कर ).

**चिकित्सक भला भला म्हणुनि फार वाखाणिला,**
**जरी बहुजनामयद्रुम समूळही खाणिला,**
**तथापि अतिदुःसहस्वगदशत्रूच्या अत्यया—**
**विना न हृदयीं धरी सरुज पामर प्रत्यया. ४४**

कारण, समजा कीं एकादा वैद्य ‘ उत्तम, उत्तम ’ म्हणून वाखाणलेला आहे, आणि त्यानें पुष्कळ लोकांचा रोगरूपी वृक्ष समूळ खणून काढलेला आहे; तथापि साधारण मनुष्य जो आहे, तो अतिदुःसह अशा आपल्या रोगरूपी शत्रूच्या नाशाखेरीज त्या वैद्याच्या गुणाविषयीं मनामध्यें खात्री बाळगणार नाहीं. ( वैद्य चांगला आहे, याबद्दल रोग्याला स्वतालाच अनुभव आला पाहिजे; त्याप्रमाणें तुम्हीं पापी उद्धरले, याबद्दल मला स्वतांला अनुभव आला तर, खरें, असा भावार्थ ).

बहु+जन+आमय+द्रुम=पुष्कळ लोकांचा रोगरूपी वृक्ष. अति+दुःसह+स्वगद+शत्रू=फार पीडणारा असा आपल्याला झालेला जो रोग तोच शत्रूस अत्यय=नाशास+रुज=रोग झालेला; पामर=हलका, यःकश्चित् मनुष्य.

म्हणा मज उतावळा गुणचि घेतला; घाबरें—
असो मन असेंचि, बा भजक-बर्हिमेघा, बरें;
दिसे क्षणिक सर्व हें भरंवसा घडीचा कसें—
धरील मन, आधिनें बहु परिभ्रमें चाकसें. ५

हे परमेश्वरा, मी आपल्या तारणासाठीं घाई करितों, या
तुम्ही मला उतावळा म्हणा, ( म्हणजे म्हणाल किंवा समजाल
तर.तो उतावळेपणाचा गूण मीं ( मुद्दाम आपले आंगीं लावून
घेतला आहे ( मीं मुद्दाम उतावळा झालों आहें ); हे भक्तरू
मोराच्या मेघा, परमेश्वरा, मन असेंच घाबरें असावें; तेंच बं
कारण हें सर्व क्षणिक दिसत आहे; तेव्हां जें माझें मन दुःखामु
चाकासारखें भ्रमण करित आहे, तें घटकेचा तरी भरंवसा कर
धरील ? ( अर्थात् मला उतावीळ झालेंच पाहिजे ).

गुणचि घेतला, इ०=उतावळेपणाचा गूण मीं मुद्दाम स्वीकारला आहे. भजब
बर्हि+मेघ=भक्तरूपी मोराचा मेघ; मोराला मेघ म्हणजे पाऊस व मेघगर्जना यां
फार आवड; तेव्हां भक्त हा मोर व परमेश्वर हा मेघ, हें रूपक मोरोपंत क
वारंवार करितों; शिवाय स्वतांचें नांव 'मोर' होतें हेंही याचें कारण आ
आधि=मनाचें दुःख

कृतांतकटकामलध्वजजरा दिसों लागली,
पुरःसरगदांसवें झगडतां तनू भागली;
सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा;
न हों जरी उतावळा, स्वरिपु कापितो हा गळा. ६

आपल्या उतावीळ होण्यास योग्य कारण आहे. हें सांगण्यां
उद्देशानें कवी म्हणतोः—यमाचे सैन्याचा शुभ्र ध्वजच अशी ज

जरा ( म्हणजे म्हातारपण ), ती दिसूं लागली; पुरःसर म्हणजे सैन्याच्या पुढें येणारे बिनीचे लोकच असे जे रोग, त्यांच्याबरोबर लढतांनाच शरीर भागलें ; ( मग सगळ्या सैन्याबरोबर लढण्याची वेळ आली असतां काय होईल ? ) मला तुजवांचून दुसरा कोणी बलवान् असा साह्यकर्ता नाहीं; तेव्हां मी जर उतावळा झालों नाहीं, तर माझा हा शत्रु माझा गळा खास कापणार !

कृतांत+कटक+अमल+ध्वज+जरा=यमाचे सैन्याचें स्वच्छ पांढरें निशाण, असें हें म्हातारपण; म्हतारपणीं सर्व शरीर पांढरें होतें, म्हणून जरा ही यमाच्या सैन्याचा पांढरा ध्वज असें ह्मटलें. पुरःसर गद=सैन्यांत जसे अघाडीचे लोक असतात, तसे यमाच्या सैन्यांत रोग हेच अघाडीचे लोक. कवि म्हणतो, थोडेसे जे अघाडीचे लोक, त्यांचे बरोबर लढतांनाच शरीर दमलें, मग पुढें कसें होणार ? न हों=न होऊं.

**अवश्य करणें खरें प्रणतरक्षण स्वोचित;**
**उशीर मग कां ? बसों कृपण मीहि कां शोचित ?**
**नव्हे प्रभुवरा ! तुम्हां उचित एकटें धावणें;**
**कृतांत शिवला नसे तंव दिसें बरें पावणें.** ४७

**अन्वय**——स्वोचित प्रणतरक्षण अवश्य करणें खरें; मग उशीर कां ? मीहि कृपण शोचित कां बसों ?—इत्यादि.

तुमच्या कीर्तीस उचित असें शरण आलेल्याचें रक्षण जर तुम्हांस केव्हां तरी करणें अवश्य आहे, तर मग उशीर कां करितां ? आणि मी अनाथ तरी उगाच चिंतेंत कां बसूं ? हे प्रभुवरा, मग आयत्या वेळीं तुम्हांस घाईघाईनें ( लवाजम्याशिवाय ) एकटें धांवावें लागेल, तें कांहीं तुम्हांस ( तुमच्यासारख्यास )योग्य दिस-

णार नाहीं; तर जोंपर्यंत मला यम येऊन शिवला नाहीं, तोंच मला पावाल, म्हणजे माझा उद्धार कराल तर तुम्हांला व मला दोघांनाही बरें.

स्वोचित =स्व+उचित=तुमच्या ब्रीदास योग्य. एकटें, इत्यादि—आतांच मला उद्धरावयास याल, का सावकाशपणें लवाजम्यानिशीं डौलानें याल? आयत्या वेळीं तशी फुरसत न सांपडून जसे द्रौपदीच्या संकटांत किंवा गजेंद्राच्या वेळीं आला, तसें एकटेंच धांवत यावें लागेल.

' कसें तरि करूं तुझें अवन, पूरवूं आळ जी—
असेल मनिं, आमुची तुज कशास रे काळजी ?'
असें जरि म्हणाल, हो प्रियतमा, जगज्जीवना ?
तदाश्रितमृगासि ती सुखसमृद्धि वा, जी, वना. ४८

हे प्रियतमा जगज्जीवना, ( अत्यंत प्रियकरा देवा ), तुम्ही कदाचित् असें म्हणाल, कीं ' आम्ही एकटे येऊं किंवा लवाजम्यासह येऊं, तुझें कसें तरी रक्षण करूं व तुझा हेतू काय असेल तो पुरवूं, त्याची काळजी तुला रे कशाला पाहिजे ? ' तर ( मला काळजी वाटण्याचें कारण असें, ( कीं ) वन जें आहे त्याला जर सुखसमृद्धी असेल ( म्हणजे तें जर सुस्थितींत असेल ), तर त्याचा आश्रय करून राहणारे जे मृग त्यांनाही सुखसमृद्धी असेल. [तेव्हां तुला सुख असेल तर आम्हांस सुख, म्हणून तुझ्या सुखाची आम्हांस काळजी आहे. ]

आळ=लळा, हट्ट, हेतू.

सुखेंचि सुख बाळका प्रकट होय मातेचिया;
तिला घडति जे श्रम, प्रियजनोत्तमा ! तेचि या;

म्हणोनि न शिवो पळ-क्षणहि कष्ट जीवा ! तुला,
विपज्जलधिसेतुला, सकललोकजीवातुला. ४९

हे सर्व प्रियजनांमध्यें श्रेष्ठ अशा परमेश्वरा, मातेला जर सुख असेल, तरच तिच्या बालकालाही सुख मिळेल; तिला जर श्रम झाले, तर तेच मुलालाही होतात. यासाठीं हे देवा, सर्वांचा जीव-प्राण, विपत्तिरूप समुद्राचा सेतू व सर्व लोकांचा जीवनदाता जो तूं त्या तुला कष्टाचा स्पर्श एक क्षणभरही न होवो !

विपद्+जलधि+सेतू=संकट-समुद्रावरील पूल, म्हणजे संकटांतून तारणारा. सकल+लोक+जीवातु=सगळ्या लोकांच्या जीवनाचा हेतू, जीवनाचा आधार.

असोत तुज आमुचीं सकल भाविकायुर्बळें;
जगोनि बहु काय म्यां सुकृत जोडिलें दुर्बळें ?
असें प्रियतमा सुखी बहुतकाळ; मायातमीं—
जना सुपथ दाखवीं; मुदित, सत्तमा, यांत मी ! ५०

( यासाठीं ) हे परमेश्वरा, आम्ही जे तुझे भक्त, त्या सर्वांचीं आयुष्यें तुला असोत;कारण मी जो दुर्बळ त्या म्यां पुष्कळ दिवस जगून तरी काय पुण्य जोडलें ? तर हे प्रियतमा परमेश्वरा, तूं पुष्कळ दिवस सुखी राहून या मायेच्या अंधकारामध्यें लोकांना सुमार्ग दाखीव; हे श्रेष्ठ परमेश्वरा यांतच मला आनंद आहे.

भाविक+आयुः+बळें=भक्तांच्या आयुष्याचीं बळें. माया+तम=अज्ञानरूपी अंधःकार.

भल परिशिले सुरासुरनरीं तसे लक्ष मीं,
म्हणोत म्हणणार, वा; तुज असा नसेल क्षमी;

उरीं भृगुपदाहती मिरवितोसि अद्यापि ती,
कवी तव यशःकथा नवसुधानवद्या पितीं. ५१

देव, दानव व मनुष्य यांमध्यें मीं 'क्षमी, क्षमी' म्हणून म्हणणारे चांगले लोक पुष्कळ ऐकले, पण त्यांत तुझ्यासारखा क्षमाशील कोणीही नसेल;—आहे म्हणून पाहिजे तर म्हणणार म्हणोत;—भृगुऋषीनें तुझ्या उरावर लाथ मारिली, त्याची खूण तूं मिरवीत आहेस; व तो नवीन सुधेप्रमाणें स्वच्छ अशी तुझ्या यशाची कथा ज्ञाते अद्यापि सेवन करीत आहेत ( ती कथा अजून साधू मोठ्या आनंदानें गातात. )

भृगु+पद+आहती=भृगूनें पायानें केलेलें ताडण. एकदां भृगु ऋषी विष्णूकडे भेटण्यास गेले, तेव्हां विष्णू सुखासनीं पडलेले होते. ते त्यांस उत्थापन देण्यासाठीं उठले नाहींत; तेव्हां भृगूनें त्यांस लाथ मारिली; त्याची खूण विष्णूचे उरावर आहे, तिला श्रीवत्स-लांच्छन असें नांव आहे. नव+सुधा+अनवद्या=नवीन सुधेप्रमाणें स्वच्छ.

भवन्मतिस आवड जरि, धनादिकालागिं ते,—
मदीय गुणकीर्तनश्रवण कां तरी त्यागिते ?
असेंहि म्हणशील, बा, जरि, तरी तुझी मावली—
तुज त्यजुनि पाजितां, कशि दुधाकडे धांवली. ५२

'तुझ्या मनाला माझ्या गुणांचें कीर्तन व श्रवण जर आवडतें असें म्हणतोस, तर धनादि ज्या जगांतल्या गोष्टी, त्यांच्यासाठीं ( त्यांचे नादीं लागून ) तुझी मती तें [ कीर्तन-श्रवण ] कां टाकते ?' असें कदाचित् तूं म्हणशील; तर तुझी आई जी यशोदा, तिला जरी तूं इतका आवडत होतास, तरी ती एकदां तुला स्तनाशीं

घेऊन पाजित असतां तुला टाकून दूध उतूं जात होतें तिकडे कशी धांवली ! [ तेव्हां कवीचा भाव असा, कीं संसारी लोकांचे हातून असें व्हावयाचेंच ).

अनावर पिशाचिका विषयवासना सत्य, जी—
असें करवि कृत्य, जी भुलवितें, कधीं न त्यजी;
म्हणोनि तुज जाणत्या विनवितों, इला काढ गा !
करीन मग, तूं जरी म्हणसि, आपणा गाढ गा. ५३

शिवाय आपलें मन दुसरीकडे कां धांवतें याचें कारण कवी सांगतो—ही विषयवासनारूपी जी पिशाची आहे, ती फार अनावर आहे; ती आम्हांला भुलवून असलें कृत्य करवितें, व कधींही सोडीत नाहीं; म्हणून तुला जाणत्याला विनवितों, कीं या पिशाचीला मजवरून काढ; मग त्याबद्दल 'मला रात्रंदिवस गा'— म्हणजे माझें निष्ठेनें भजन कर—असें जरी तूं म्हणशील तरी तें करीन.

जाणता=पंचाक्षरी, इला काढ=पंचाक्षरी; माणसांवरचीं भुतें मंत्र-तंत्र करून घालविणें, त्यांला भुतें काढणें म्हणतात.

तुझ्या गुणकथा महासुरभि, त्यांत ही रासभी—
शिरे विषयवासना; जशि शुका अहीरास भी,
तशी न इतरांस भी; इस सदंडही हाकिती,
तथापि बहु लाथळी; मग अदंड मी हा किती ५४

तुझ्या गुणांच्या कथा ह्या श्रेष्ठ कामधेनू आहेत; त्यांत ही विषयवासनारूपी गाढवी शिरते ( शिरून आमचेकडे येते ); ती

शुकमुनीसारख्या गवळ्यास जशी जुमानते, तशी आमच्यासारख्या इतरांस जुमानीत नाहीं; पुष्कळ लोक हिला हातीं (इंद्रियनिग्रह-रूपी ) दंड घेऊन हाकतात, तरी त्यांचेवर देखील ती लाथा झाडिते: मग अदंड जो मी ( म्हणजे ज्याचे हातांत कांहीं दंड वगैरे नाहीं असा मी ) त्याची कथा काय ? (म्हणजे मला कशाची ती जुमानणार ? )

खरासुर जसा, तशी विषयवासना हे खरी;
हिचा वध करावया तुजचि शक्ति आहे खरी;
बकी सुमति, ताटका लघु, न हे भली; लाजशी—
उगाचि; तशी एक ही, व्रजवनांत लीला जशी. ५५

तुम्हीं रामावतारीं मारलेला जो खरासुर, त्यासारखीच ( तित-क्याच योग्यतेची ) ही विषयवासनारूप खरी ( गाढवी ) आहे; ती बकी ( पूतना ) देखील म्हणायला बरी, ( कारण तिचा तुम्हांस स्तनपान देण्याचा चांगला हेतु तरी होता ); ती ताटका देखील हिच्यापेक्षां कमी योग्यतेची, ( इतकी दुष्ट नव्हती ), पण ही कांहीं भली नव्हे; तर हिचा वध करण्यास तुम्ही संकोच कां करितां ? व्रजवनांत ( गोकुळांत ) जशा तुम्ही लीला केल्या , त्यांतलीच ही एक लीला आहे; दुसरें काय ? ( ही स्त्री म्हणून तुम्हांस संकोच वाटत असेल, तर पूतना ही स्त्री होती; ही खरी गाढवी—म्हणून वाईट वाटत असेल तर तो खर—गाढव—तुम्हीं मार-लाच; तेव्हां हिला मारण्यांत संकोच धरण्याचें कारण नाहीं असा भाव ).

खर=रामानें दंडकारण्यांत मारलेला एक राक्षस.

कसें तरि असो मग; स्वपणरक्षणाकारणें—
अवश्य शरणागतव्यसन तों स्वयें वारणें;
तुम्हां विहित मुख्य हें; न पुसतां करा हो ! खरी—
निजोक्ति; खरा काय तो अधिक ? संहरा हो खरी. ५६

**अन्वय**—मग कसें तरी असो, स्वपणरक्षणाकारणें तों शरणागतव्यसन स्वयें वारणें अवश्य; हें तुम्हां मुख्य विहित; (यास्तव) हो ! न पुसतां निजोक्ति खरी करा; तो खर काय हो अधिक ? खरी संहरा.

कोणत्याही कारणानें कां होईना, पण तुमची भक्तांचें संकट निवारण करण्याची जी प्रतिज्ञा आहे, तीसाठीं आपणांस शरण आलेल्याचें संकट तुम्हांस स्वतांला निवारण करणें अवश्य आहे; हीच गोष्ट मुख्यतः तुम्हीं करणें उचित आहे; यासाठीं आपलें वचन खरें करा; तो खर ( दैत्य ) काय अधिक ( दुष्ट ) होता ? ही खरी ( विषयवासनारूपी राक्षसी ) तशीच दुष्ट आहे; हिचा संहार करा.

खरी करितसे कशी तव जनींहि सत्ता, पहा;
इचा वध न निंद्य, बा, प्रबळ मूर्त सत्ताप हा;
' कथासुरभिचा रस स्वहित, पुष्कळ, स्वादु ही, '
म्हणे, 'त्यजुनि कां मला निजधना परस्वा, दुहीं ?' ५७

**अन्वय**—( तिसरा व चवथा चरण ) ( ती खरी म्हणते ) ' कथासुरभिचा रस स्वहित, पुष्कळ, स्वादु ही ( आहे ); ( पण ) निजधना त्यजुनि परस्वा कां ( दुहितां ), मला दुहीं.

ही जी विषयवासनारूपी खरी, ती तुझे जे जन म्हणजे भक्त, त्यांना एक मोठा प्रबळ असा मूर्तिमंत तापच आहे; यासाठीं हिला मारणें कांहीं निंद्य नाहीं; ती त्यांचेवर ( भक्तजनांवर ) कशी सत्ता चालविते पाहा;—ती त्यांना म्हणते, ‘ कथारूपी कामधेनूचें दूध हितकारक, पुष्कळ व मधुरही असेल, पण मी जी तुमची स्वतांची, तिला टाकून लोकांच्या धेनूला कां दुहितां? मला दुहा ! ’

मुर्त=मूर्तिमंत. सत्ताप=अत्यंत मोठा ताप. परस्व=परक्याची वस्तु.

कथासुरभि या भल्या स्वजननीहुनी वाटती;
शिशूंस जरठांसही निराखितां रसें दाटती;
दुहोत भलते सदा तरि न लेशही आटती;
स्ववत्समल भक्षिती, परि न सर्वथा वाटती. ५८

या ज्या कथारूपी कामधेनू, त्या आम्हांस स्वमातेपेक्षांही भल्या वाटतात; कारण इतर धेनू किंवा माता, यांना पोराला पाहून मात्र पान्हा फुटतो. पण या लहान थोर कोणासही पाहून पान्हावतात; कोणीही त्यांचें दूध काढू लागला, तरी त्या पान्हा चोरीत नाहींत; ( इतर धेनू पुष्कळदां पान्हा चोरतात ); इतर धेनूंनीं आपल्या वासरांचें मळमूत्र खाल्लें, तर तें लोकांना आवडत नाहीं; पण या आपल्या वत्सांचा [ भक्तांचा ] पापरूपी मळ भक्षितात, तरी या अगदीं वाटत नाहींत.

कथांसि उपमा दिली सुरभिची, दिसे नीट ती;
परंतु बहुमंद मी, म्हणुनि सच्छ्रुती वीटती;

कथा निरुपमा, तयाप्रति पशूपमा शुद्ध तें—
न॒ह्हेचि; न विचारिलें बुधजनांसि म्यां उद्धतें. ५९

कथांना कामधेनूची उपमा दिली ती मला नीट दिसते; परंतु मी मूर्ख म्हणून माझी उपमा अयोग्य ठरून, साधूंचे कान विटतात [ साधूंना ही उपमा गोड वाटत नाहीं ); खरोखरी कथांना उपमाच नाहीं, आणि मी तर त्यांना पशूंची उपमा देतों हें कांहीं वास्तविक बरोबर नाहीं; मी जो दांडगा, त्यानें उपमा द्यावी कसली आणि न द्यावी कसली, हें शहाण्यांना विचारलें नाहीं.

सत्+श्रुति=साधूंचे कान.

असेंहि उपदेशिती गुरु रहस्य मंदा, रुचे,—
निजस्तव जसा तसा, अगुण घे न वंदारुचे;
म्हणोनि निगमस्तुता भलतसें तुला वानितों,
परंतु हृदया महाजनभयास मी मानितों. ६०

( साधूंना विचारलें नाहीं, ही गोष्ट खरीच; पण दुसरें कारण असें— ) गुरू माझ्यासारख्या मूर्खाला अशी खुबी सांगतात कीं, ' तुला परमेश्वराला स्वतांचा स्तव जसा कोणी करील तसा आवडतो; वंदन करणाराचे अगुण ( दोष ) तूं कांहीं मनांत आणीत नाहींस; 'म्हणून हे वेदांनीं स्तविलेल्या परमेश्वरा, तुझी मी भलतशी [ म्हणजे येते तशी ] स्तुति करितों; तथापि महाजन काय म्हणतील, इकडेही माझें लक्ष असतेंच.

रहस्य=सुखाची गोष्ट. वंदारु=वंदनशील-वंदन करणारा; निगम+स्तुत=वेदांनीं स्तविलेला; ' ज्याला वेदांनीं स्तविलें—व अखेरीस आमच्यानें स्तवन

नीट होत नाहीं असें म्हणून हात टेंकले, त्याचें स्तवन मी नीट कसें करणार ?' असा यांत भाव आहे.

म्हणें—' स्वकृतिच्या उणें किमपि एक वर्णी न हो;
असें तुज कधीं बरें विगतशंक वर्णीन हो !'—
अशेचि आशि आवडी, कारेशि कां न अत्यादर ?
स्वभक्तसुरपादपा ! हरि ! नसेचि सत्या दर ६१

हे भक्तांना कल्पवृक्षासारख्या अशा परमेश्वरा, मी मनांत असें म्हणत असतों कीं, माझी जी कृती म्हणजे कविता, तिच्या एका अक्षरांतही कांहीं उणें नसावें, अशा रीतीनें अगदीं निःशंक होऊन तुला कधीं वर्णीन ?' माझ्या मनाची अशी आवड आहे. तर माझा प्रेमानें स्वीकार कां करीत नाहींस ? खरें सांगावयास भीती कशाला पाहिजे ? ( भावार्थ असा कीं, " माझा हेतु चांगला आहे, व तूं भक्तांना कल्पवृक्षासारखा आहेस, तेव्हां आपल्यास पाहिजे तशी कविता करून घे व माझाही हेतु पूर्ण कर; असा एकंदरींत माझ्या मनाचा खरा प्रकार आहे. "

विगत+शंका=विगत म्हणजे गेलेली आहे शंका ज्याची, बहु० स० स्वभक्त+सुर+पादप=भक्तांचा कल्पवृक्ष.

ध्रुव स्तवानें आवडी धरि, म्हणोनि अत्यादरें—
तुम्हीं करुनि दाविली, शिवुनि गल्ल सत्या दरें;
तसें मज करा, करांबुज धरा शिरीं, मावरा !
वराभयपरा ! पराक्रमपटो ! मना आंवरा. ६२

हे लक्ष्मीपते, वर आणि अभय देणाऱ्या, पराक्रमपटो परमेश्वरा, ध्रुवानें तुझी भक्ति करण्यांत आवड धरिली, तेव्हां तुम्हीं आपल्या

शंखानें त्याच्या गालाला स्पर्श करून त्याची आवड खरी करून दाखविली ( म्हणजे त्याचेवर प्रसाद केला ); तसेंच माझ्या संबंधानें करा, व तुमचा करांबुज म्हणजे कमलाप्रमाणें सुंदर असा हात किंवा तुमच्या हातांतलें कमळ माझ्या मस्तकीं धरा, ( मावरा, वराभयपरा व पराक्रमपटो, हीं विशेषणें कवीनें अगदीं अन्वर्थक घातलीं आहेत; त्या विशेषणांनीं आपण जें मागणार, तें देण्याचें सामर्थ्य तुम्हांस आहे, असें दाखविलें आहे. )

**करांबुज असो; नसे उचित त्यास मी पामर;**
**प्रणाम करिती पदाप्रतिहि सन्मती सामर;**
**पदाब्जरजही जगत्त्रयनमस्क्रियाभाजन;**
**प्रसादचतुरा, कसा तरि करा बरा हा जन.** ६३

' माझ्या डोक्यावर करांबुज धरा ' हें मागितलेलें मागणें फार आहे, असें वाटून कवी म्हणतो;—मी पामर तुम्हीं आपलें करांबुज माझे डोक्यावर धरण्यास पात्र नाहीं, यासाठीं त्याची गोष्ट राहूं द्या; इंद्रादिदेवांसहित सन्मुनी म्हणजे नारदादि मुनी तुमच्या पायांना प्रणाम करितात, यासाठीं तुमच्या पदकमलाची धूळी जगत्रयाच्या नमनास पात्र झाली आहे ( तेव्हां ती देखील मला पुरे, अगोदर ती तुमच्या पायांची धुली; त्यांतही तिच्यामध्यें इंद्रादि देव व नारदादि सन्मुनी यांनीं नमन केलेलें, तेव्हां तिचीच योग्यता फार आहे ); सारांश, हे प्रसाद करण्यांत चतुर अशा परमेश्वरा, कशा रीतीनें तरी माझेवर कृपा करून माझें कल्याण कर.

सामर=अमरांसहित असे ( सन्मुनी ) बहु० स०. जगत्+त्रय+नमस्क्रिया+भाजन=त्रिभुवनाचें नमन करण्याचें स्थान

तुम्हीं करुनि दाविला ध्रुव कृतार्थ जैसा दरें,
तसेंचि जरि योजिलें तुमचिया मनें सादरें,
असो; विहित तें करा; परि बरोबरी त्यासवें--
नसे उचित; तो महाप्रबळ वंदिजे वासवें. ६४

ज्याप्रमाणें तुम्हा शंखाच्या स्पर्शानें ध्रुवाला कृतार्थ केलें, तसेंच माझ्या संबंधानें करावें असें जरी–तुमचें मन प्रीतीयुक्त असल्यामुळें –तुम्हीं योजिलें असेल, तरीही कांहीं हरकत नाहीं; जें तुम्हांस योग्य दिसेल तें करा; बाकी ( माझें मत तर असें आहे कीं, ) त्याची माझी बरोबरी होणें कांहीं योग्य नाहीं, तो फार थोर. त्याला इंद्रानें वंदन करावें.

सादर=फार ममताळू; प्रीतियुक्त ( मन याचें विशेषण ); वासवें वंदिजे–' तो वासवें वंदिजे, ' असा कर्मणि प्रयोग किंवा ' त्याला वासवें वंदिजे ' असा भावी प्रयोग करावा; ' वंदिजे ' हें जुनें कर्मणि किंवा भावी रूप आहे ( प्रौ० व्या० क० २१४ ).

किती वय, कसें तप प्रखर, काय विश्वास तो ?
ध्रुव ध्रव खरा; स्तवा उचित होय विश्वास तो;
कशी तुळितसां तुम्ही प्रकट मेरुशीं मोहरी ?
प्रसाद करितां उणें अधिक नाठवा, हो हरी ! ६५

( त्या ध्रवाची व माझी बरोबरी कशाला पाहिजे; त्याचें तें वय केवढें ( आणि फारच अल्पवय असून ) तप तरी केवढें कडक! तशीच तुमच्यावर त्याची श्रद्धा तरी केवढी ? त्याला ध्रुव ( म्हणजे निश्चयी ) हें नांव अगदीं योग्य होय ? सगळ्या विश्वानें स्तुति

करण्यास तो योग्य आहे; तेव्हां त्याची माझी बरोबरी करून तुम्ही धडधडीत मेरूशीं मोहरीची कशी तुलना करितां? परंतु कदाचित् याचें कारण असें असेल, कीं तुम्ही प्रसाद करितांना उणें अधिक पहात नाहीं (म्हणजे तुम्ही कृपा करूं लागला, कीं सर्वांवर सारखी कृपा करितां, तुमचे घरीं पंक्तिप्रपंच नाहीं, असा भाव).

ध्रुव=निश्चयी, अढळ, पक्का, विश्वास स्तवा उचित होय, इत्यादि=सर्व विश्व त्याचा स्तव करिते—त्यास नित्य प्रदक्षिणा घालीत आहे. प्रकट=स्पष्टपणे धडधडीत.

प्रभुत्व तरि हेंच कीं करुनि दे कृपा दान तें,
स्वसाम्य यदुपार्जनें मिरविजे स्वपादानतें?
प्रसाद गम काय तो, जरि निवारिना लाघवा?
कसें दशमुखानुजा विसरलां? अहो राघवा! ६६

प्रभुत्व यालाच म्हणावयाचें, कीं जें (प्रभुत्व) कृपा करून अशा प्रकारचें दान (देणगी) देतें, कीं आपल्या पायांना (आनत म्हणते अत्यंत नम्र झालेला जो तुमचा भक्त) त्यानें तें दान मिळवून त्याच्या योगानें तुमचें साम्य मिरवावें (तुमच्या सारखें व्हावें); अंगीं जो कमीपणा असेल तो जर (त्याचे योगानें) जात नाहीं तर तो प्रसाद कसला? हे देवा राघवा (रामचंद्रा), तुम्ही रावणाचा भाऊ जो बिभीषण त्याला कसें विसरलां? (म्हणजे त्याचेवर कृपा करून तो लहान होता त्यास आपलेबरोबरीचा राजा लंकाधीश करून टाकिलें.)

प्रभुत्व=स्वामित्व; स्वसाम्य=ईश्वराचें साम्य; देवत्व; स्व+पाद+आनत=तुमच्या पायांना अत्यंत नम्र; लाघव=लघुत्व, हलकेपणा; दशमुखानुज=बिभीषण, राव

त्याचा धाकटा भाऊ; रावण—कुंभकर्णादिकांस मारल्यावर रामानें यास लंकेचें राज्य दिलें.

असो वरि कसा तरी, विमल भाव ज्याचा, करा—
तयावरि दया; पचे वर असाचि द्या चाकरा ;
वृथाचि गमतें दिलें, बहुहि; जें न दासा जिरे ;
पुसोनि अधिकार द्या; सुकर तें सदा साजिरें. ६७

मी तुझा दास वर कसाही असलों तरी ज्याचें अंतःकरण निर्मळ आहे, अशा माझ्यावर दया करा ! या मला चाकराला ( दासाला ) पचेल ( बाधणार नाहीं, झेपेल) असाच वर द्या;तुम्ही आपल्या त्या दासाला जरी पुष्कळ दिलें आहे, तरी तें मला जिरत नाहीं, म्हणून तें व्यर्थच दिलें असें मला वाटतें;तेव्हां माझा अधिकार ( योग्यता ) किती आहे हें पाहून त्याप्रमाणें मला [ काय द्यायचें तें ] द्या; जें करण्यास सोपें असतें, तें नेहमीं चांगलें होत असतें. ( त्याप्रमाणें मला सोपेंसें, माझ्या योग्यतेचें काम करावयास द्या म्हणजे माझ्या हातून तें नीट होईल. )

भाव=अंतःकरण; अधिकार=योग्यता.

प्रसन्न बहु होतसां, परि कराल हो ! बावरें—
शिवापरि वरासवें हृदय, हें न हो बा बरें ;
असा वृक कृतघ्न हें न कळलें कसें हो हरा ?
भला जगविला तुम्हीं भवमहाहिचा मोहरा. ६८

तुम्ही मला फार प्रसन्न होत आहां खरे, पण हे परमेश्वरा, वरदान देतांना तुमचें मन शिवाप्रमाणें भांबावून जाईल, एवढें मात्र

वरानें होऊं देऊं नका बरें ! एवढा शिव, त्याला तो बकासुर ( भस्मासुर ) असा कृतघ्न असेल हें कसें कळलें नाहीं ? बाकी तुम्हीं भवरूप महासर्पाचा मोहरा म्हणजे औषधी मणी असा जो शंकर, ( भवभयाचें हरण करणारा ), त्याचे प्राण वांचविले, हें मात्र भलें काम केलें.

बावरें–भांबावलेलें; वृकासुर म्हणून दैत्य होता, त्यानें शिवास प्रसन्न करून घेऊन असा वर घेतला कीं, ज्याचे डोकीवर हात ठेवावा त्याचें भस्म व्हावें. या वरानें तो उन्मत्त होऊन सर्वांना त्रासवूं लागला. शेवटीं शिवाचेहि पाठीस लागून त्याचे मस्तकीं हात ठेवूं लागला. तेव्हां विष्णूनें मोहिनी नामक सुंदर स्त्रीचें रूप घेऊन त्याला फसविलें, व त्याला आपल्याच मस्तकावर आपला हात ठेवण्यास लाविलें. त्यामुळे तो भस्म झाला. याचें भस्मासुर असेंही नांव आहे. मोहरा=सर्पांचा मणी; हा सर्पाचे विषावरच औषधी आहे, अशी समजुत आहे. येथें संसारास सर्पाची उपमा देऊन शिव हा त्याचा मोहरा म्हणजे वीष उतरविणारा मणी, असें म्हटलें आहे.

भजे सुदृढनिश्चयें द्विजकुमारक क्षीरधी,
तया करिं तुम्हीच द्या, मदनमारक ! क्षीरधी ;
उदारपण तें बरें, सुखवि जें सुपात्रा सदा :
दिलें अमृत पन्नगा, तशि खळीं कृपा त्रासदा. ६९

ही केका शंकरास उद्देशून आहे. कवि म्हणतो, हे मदनांतका शंकरा, ( तुम्हांस योग्य स्थानीं वर देतां येत नाहीं असें नाहीं ; उदाहरणार्थ– ) तो ब्राह्मणपुत्र जो उपमन्यू, त्याला दूध पाहिजे होतें, म्हणून त्यानें तुमची फार भक्ति केली; तेव्हां तुम्हीं त्यास क्षीरसमुद्र दिला ( हें योग्य केलें ). जें उदारपण सुपात्र म्हणजे दानयोग्य जो असतो त्याला तृप्त करितें, तें उदारपण चांगलें ;

नाहींतर सर्पाला जसें दूध पाजावें, त्याप्रमाणें दुष्टावर कृपा केलेली त्रासदायक होते.

क्षीरधी द्विजकुमार=उपमन्यु नामक एक प्रख्यात ऋषी होऊन गेला. तो लहान असतां त्याची आई गरिबीमुळें त्यास दुधाऐवजीं पाण्यांत पीठ कालवून देई. एकदां त्यानें खरें दूध आपल्या मित्राच्या घरीं पाहिलें, तेव्हां तो तें पिठ-वणी घरीं पिईना; व अखेरीस त्यानें शंकराची तपश्चर्या केली, तेव्हां शंकरानें त्यास क्षीरसमुद्रच दिला. यावरून येथें उपमन्यूला क्षीर-धी म्हणजे दुधाची इच्छा करणारा, असें म्हटलें आहे. मदनमारक=शंकरानीं मदन जाळला ही कथा प्रसिद्धच आहे. म्हणून त्यास मदनमारक, मदनारी, मदनांतक, इत्यादि नांवें देतात. पन्नग=पद्+न+ग=पायांनीं जात (चालत) नाहीं असा; सर्पास पाय नाहींत हें सर्वांस माहीत आहेच.

अतिप्रिय, सुखप्रद, प्रथम तूं मुदंभोद, या—
मयूरहृदया तुझी क्षण विटो न शंभो दया;
उदारपण वानिलें; अजि, गुरूपहासा बळें—
कसें करिल लेंकरूं ? निपट हें पहा सावळें ७०

शंकराला फाजील उदारपणाबद्दल आपण दोष दिला, तेव्हां त्यास कदाचित् राग आला असेल, असें मनांत आणून शंकराचें सांत्वन करीत होत्साता कवि म्हणतोः—हे शंभो, तूं आनंदरूपी उदकाचा मेघ, या भक्तरूप मयुराच्या (मोरोपंताच्या) हृदयास अतिप्रिय व सुखकारक आहेस; तेव्हां माझ्यावरची तुझी दया कमी करूं नको. मी उदारपणाची स्तुतीच केली; हें मूल मुद्दाम, जाणूनबुजून थोराचा उपहास कसें बरें करील ? हें मूल (म्हणजे कवि स्वतः) केवळ भोळसर आहे एवढें मनांत आण.

मुद्+अंभस्+द=आनंदरूप उदक देणारा (मेघ); सावळें=भोळसर साधे भोळें.

तुम्हां हरिहरांत ज्या दिसतसे, दिसो; वास्तव—
प्रबुद्ध म्हणती, नसे तिळहि भेद मी यास्तव—
म्हणें मनिं, यथार्थ जें स्वमत वर्णिती शैव तें—
न; वैष्णव दुराग्रही; परम मुख्य हीं दैवतें. ७१

तुम्ही जे विष्णु आणि शंकर ह्यामध्यें ज्याला भेद दिसत असेल त्याला दिसो; पण शहाणे म्हणतात कीं, वास्तविक दोघां-मध्यें तिळभरही भेद नाहीं; यास्तव मी आपल्या मनामध्यें म्हणतों कीं, शिवभक्त [शिव श्रेष्ठ आहे असें] जें आपलें मत सांगतात तें यथार्थ नाहीं; व विष्णुभक्त (जे विष्णु श्रेष्ठ म्हणतात, तेही) दुराग्रहीच होत. हीं दोन्हीही दैवतें अगदीं मुख्यच आहेत; (दोन्हीं सारखीच श्रेष्ठ आहेत असा भाव).

प्रबुद्ध=शहाणें.

म्हणें क्षण पुरांतक; क्षण मुरांतक; ब्राह्मणा—
मला जरि म्हणाल बा! तरि विशंक लुब्रा म्हणा;
तुम्हां शिव, शिवा तुम्ही भजतसां; शुक व्यास हा—
सदर्थ वदले; पुरातन कथा, न नव्या सहा. ७२

मी तुम्हांस एकदा पुरांतक (त्रिपुरास मारणारा शिव) व एकदां मुरांतक (मुर दैत्यास मारणारा विष्णु) असें म्हणतों, याबद्दल मला गरीब ब्राह्मणाला पाहिजे तर खुशाल लुब्रा म्हणा; (पण खरी गोष्ट अशी आहे कीं, तुम्हाला शिव भजतो व तुम्ही शिवाला

भजतां ( तेव्हां आतां श्रेष्ठ कोण ) ? असें मीच म्हणतो असें नाहीं तर हा खरा अर्थ शुक–व्यासासारखे मोठमोठे वदले आहेत; या जुन्याच कथा आहेत, मीं कांहीं नव्याच ( बनवून ) सांगतों असें नाहीं; तेव्हां मी म्हणतों हें सहन करा ( ऐकून घ्या ).

**तुझाचि अवतार तो सुत पराशराचा; बळें—**
**तदुक्तिस जन; प्रभो, जरि निजेमधें चावळे,**
**तरी, त्रिभुवनेश्वरा, तव विशुद्ध नामावळी—**
**मुखीं प्रकट होय, जी करि सुखी जना मावळी. ७३**

हे प्रभो, मीं व्यासाचा आधार सांगितला तो व्यास असा तसा कोणी साधारण मनुष्य नाहीं, तर तो तुझाच अवतार आहे; त्याच्या वचनास लोक मान देतात; हे त्रिभुवनेश्वरा देवा, तो व्यास ( तुझा एवढा मोठा भक्त आहे कीं, तो ) जरी झोपेंत चावळला, तरी त्याचे तोंडांतून जी लोकांना आईप्रमाणें सुखी करिते ती तुझी पवित्र नामावळीच निघते.

**तुझें कुशल नाम जो नर हळू हळू आकळी—**
**दुरत्यय असा महाखळहि त्यास भी हा कळी;**
**हरी व्यसन पाप हें बहु कशास, कायाधवा—**
**परी त्वरित भेटवी तुजहि, योगमायाधवा ! ७४**

हे परमेश्वरा, तुझें कल्याणकारक नांव जो मनुष्य हळूहळू घेऊं लागतो, त्याला फार दुष्ट व अत्यंत प्रबळ असा जो कलि तोहि भितो; तें नांव दुःख व पापें हरण करितें; फार कशाला; [तें नाम] योगमाया म्हणजे मूलप्रकृति जी तिचा स्वामी जो तूं त्या तुझीही प्रल्हादास जशी झाली तशी, भेट करून देतें.

आकळणें=स्वाधीन करून घेणें; दुरत्यय=दूर्+अति+इ–धातु=ज्याचे वरून पली-कडे जाण्यास कठीण असा दुर्जय. कायाधव=कयाधूचा मुलगा, प्रल्हाद. योगमाया-धव=योगमाया म्हणजे मूलप्रकृति, जिच्या योगें प्रथमतः परमेश्वरास सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा उत्पन्न झाली

**तुम्हांसमाचि हें गुणें, अणु उणें नसें नाम, हा—**
**दिसे अधिकही तसा गुण, तुला असेना महा;**
**सदैव भलत्यासही सुलभ, आणखी गायका—**
**छळी न, न अधोगति क्षणहि दे, जगन्नायका ! ७५**

हे जगन्नायका परमेश्वरा, तुझें नांव गुणांनीं तुझ्यासारखेंच अगदीं आहे, अणुमात्रही उणें नाहीं; हा एक मोठा गुण तर त्यामध्यें जास्तीच आहे–तो तुझ्यामध्यें नाहीं; तो कोणचा ? तर तें नाम नेहमीं हवें त्याला सुलभ असतें; व जो नाम गातो त्याला तें छळीत नाहीं किंवा क्षणभरही अधोगति देत नाहीं.

भलत्यास ही सुलभ=परमेश्वराची यज्ञयाग, योगसाधन, ध्यान, वगैरे साधनांनीं भक्ति करण्यास तऱ्हेतऱ्हेचे अधिकार अंगीं पाहिजेत; नांव घेण्यास तसलें कांहीं नको; तें हवें त्यानें घ्यावें; भक्तिमार्ग सर्वांस सुलभ आहे. गायका न छळी–इ०=बळीनें प्रत्यक्ष तुमची भक्ति केली, त्याला तुम्ही छळिलें व अधोगतीला–पाताळीं–पाठविलें; तुमचें नांव असें कोणास छळीत नाहीं. तेव्हां कवी म्हणतो, कीं तुम-च्यापेक्षां तुमच्या नांवामध्यें हा गुण विशेष आहे

**छळी नृप बळी बळी तरिच, तो नसे आटला—**
**गमे बहु भला, मला न, सकळांस ही वाटला;**
**परीक्षक करी तसें जडहि सोशितें हेमही;**
**न केवळ विरोचनात्मज तरे पदें, हे मही. ७६**

त्या बळीचा जेव्हां तुम्हीं छळ केला, तेव्हां तो बलवान् असा बळीराजा म्हणूनच टिकला—हार गेला नाहीं. तो मोठा भला असें मलाच नाहीं, तर सगळ्यानाहीं वाटतें; ( आतां बळीनें एवढा छळ सोसला कसा ? तर ) जड असें जें सुवर्ण तेंही त्याची परीक्षा करणारा ( अग्नींत घालून तावणें, घासणें वगैरे ) जसें करितो तसें सोसतें; [ तर मग जाणता असा जो बळी, तो सोशील यांत नवल नाहीं ]. तुमच्या पायाच्या योगानें केवळ बिरोचनाचा मुलगा जो बळी तोच तरला असें नाहीं, तर ही सर्व मही तरली.

छळी=तुम्हीं छळ केला त्यामध्यें—तेव्हां.

असा न करितां जरी छळ, तरी प्रभो, तो भली—
सुकीर्ति कशि पावता; कविसभा जिणें शोभली ?
पदीं उपजती नदी कशि, कशी त्रिलोकीं सती—
अशा अतुल मौक्तिकावलिविणें बरी दीसती ? ७७

हे प्रभो, तुम्हीं जर त्याचा असा छळ केला नसता, तर तो एवढी मोठी सुकीर्ति—जिच्या योगानें कवींची सभा शोभली [ म्हणजे जी कीर्ति गाऊन कवींनीं कीर्ति मिळविली ], ती—कशी त्याला मिळाली असती ? तसेंच तुमच्या पायापासून पवित्र गंगा नदी कशी उत्पन्न झाली असती ? व अशी जी ही अतुल कीर्ति, हीच मोत्यांची माळ, तिच्यावांचून ही त्रिलोकी [ त्रिभुवन ] रूप जी स्त्री ती, सुंदर कशी दिसली असती ? [ एरव्हीं त्रिभुवनास शोभा कशी आली असती ? ]

कविसभा--इ०=तुम्ही छळ केला म्हणून बळीचें चरित्र घडलें व कवींना तें वर्णन करण्यास सांपडलें. पदी उपजती नदी कशी ?--इ०=वामनानें प्रचंड रूप धारण करून जव्हां दुसऱ्या पावलानें ब्रह्मांड व्यापलें त्यावेळीं आंगठ्याच्या जोरानें ब्रह्मांडाचें कवच फुटून गंगा उत्पन्न झाली, अशी कथा आहे. अतुलमौक्तिक--आवली=अमोलिक अशी मोत्यांची माळ.

नको छळ, अधीर मी, तशि न कीर्ति हो; चामरें—
नृपासि उचितें; वृथा, मिरविलीं जरी पामरें;
अकीर्तिच असो, रुचे तुज कशी व्रजीं कांबळी ?
असें न समजा कसें ? वरिल हारिला कां बळी ? ७८

मला तुमचा असा हा छळ नको [ माझी तुम्ही छळ करून परीक्षा पाहूं नका ], मला इतका धीर कोठें आहे ? मला अशी मोठी कीर्तिही व्हावयास नको; राजचामरें [राजचिन्हें] राजालाच शोभतात; एकाद्या पामरानें जर तीं धारण केलीं तर व्यर्थच; मला आपली अकीर्तीच आवडते; तुम्हांस गोकुळांत कांबळे कसें आवडलें ? [ आतां तुम्ही म्हणाल कीं, बळीनें छळ कसा सोसला ? तर ] बळी म्हणजे बलवान् जो आहे, तो हार कशी घेईल, हें तुमच्या कसें मनांत येत नाहीं ?

चामरें=राजचिन्हें; हार=पड, कमीपणा.

छळाल कृपणासि कां अजि दयानिधे; कांपिती—
भटासि भट संगरीं परि न कातरा दापिती;
कराल तितकी कृपा बहु; अहो शरण्या तमीं—
बुडोनि शरणागत भ्रमतसें अरण्यांत मी. ७९

हे दयानिधे परमेश्वरा, मी जो कृपण म्हणजे ज्याचे जवळ कांहीं नाहीं असा, त्याला तुम्ही उगाच कशाला छळाल ?

योद्धयाला योद्धा समरांगणामध्यें भिववतो; परंतु भिऱ्याला कांहीं कधीं भेवडावीत नाहीं. हे शरण्या [ ज्याला लोकांनीं शरण जावें अशा ] परमेश्वरा, मीं शरणागत [ शरण आलेला ] या भवरूप अरण्यामध्यें अज्ञानधकारांत बुडून श्रम पावत आहें तर; माझ्या-वर तुम्ही जेवढी कृपा कराल, तेवढी फारच आहे.

कृपण=मूळचा अर्थ ज्याचे जवळ कांहीं नाहीं असा सध्याचा अर्थ जो आपल्या-जवळ असून नाहीं असें दाखविनां तो. शरण्य=ज्याला शरण जाणें योग्य असा; तम=अज्ञानरूप अंधकार.

मुखासि जंव पातलीं ' श्रम, अरण्य ' ऐशीं पदें,
निजस्मृतिस जाहलीं विषय तीं तव श्रीपदें;
गुरुक्तिस करावया सफल, जानकीजीवना,
धरासुरतपःफळें त्वरित धांवलीं जीं वना. ८०

' श्रम ' आणि ' अरण्य ' हे शब्द माझे तोंडांत येतांच. हे सीतापते रामा, भूदेव जे ब्राह्मण त्यांना तपश्चर्येनें प्राप्त होणारे व पित्याचा शब्द खरा करण्यासाठीं लवकर अरण्याकडे धांव घेणारे असे तुझे सुंदर पाय, त्यांची मला आठवण झाली. [ म्हणजे रामावतारी तुम्ही अरण्यांत जे श्रम सोशिले त्यांची, अर्थात् श्रम सोसणारे जे तुम्ही त्या तुमची, अठवण झाली. ]

निज स्मृतिस विषय=मला त्यांची आठवण झाली ; श्री-पदें शोभायुक्त सुंदर पावलें; गुरुक्तीस=दशरथानें कैकेयीस वचन दिलें होतें तें खरें करण्यासाठीं रामानीं अरण्यवास पत्करला. धुरा+सुर+तपः+फळें=भूदेव जे ब्राह्मण, त्यांना तदश्चर्येनें मिळ-णारी ( पदें. )

तयीं प्रभुवरा ! तसे सदय, कां असे आज हो ?
विचारुनि पहा बरें निजमनीं, महाराज हो !

**वनोवानें फिरा पिशापरी, म्हणा अहोरात्र ' हा ' !**
**नसे कुशल भाषणीं परि असे कृपापात्र हा. ८१**

अहो महाराज, त्यावेळीं [ रामावतारीं अरण्यांत असतां ] वनोवनीं वेड्यासारखे फिरत होता व रात्रंदिवस ( सीतेसाठीं ) शोक करीत होता, तेव्हां देखील तसें सदय झाला होता ( म्हणजे त्यावेळीं देखील त्या शबरीवर दया केली) आणि आज असे अदय कां ? याचा विचार आपले मनांत करून पहा; ( ती शबरी जशी बोलण्यामध्यें कुशल होती, गोड गोड बोलत होती, तसा ) जरी मी बोलण्यांत कुशल नाहीं, तरी हा मी तुमच्या कृपेला पात्र आहे. ( यांत कवी देवाला अशी आठवण देतो कीं, रामावतारीं सीतेसाठीं शोक करीत रानोमाळ हिंडत असतांना देखील तुम्हीं शबरीवर दया केली; मग आजच काय झालें आहे ? )

**समागम तुझा घडो म्हणुनि जाहले लांकडे,**
**तपोनिधी तसे मुनि त्यजुनि, जोडिलीं मांकडे,**
**अयुक्त बहु ज्या जनास्तव घडे, पडे साकडे,**
**तदुक्तिहुनि आमचें बहुत बोलणें वांकडें. ८२**

त्याच रामावतारीच्या आणखी गोष्टी:—तुझा समागम व्हावा म्हणून जें तप करून लांकडासारखे झाले असे जे तपोनिधि मुनि, ते टाकून तुला वानराबरोबर सख्य करावें लागलें; अशा प्रकारच्या अयोग्य गोष्टी ज्या जनासाठीं कराव्या लागल्या व दुसरीही संकटें प्राप्त झाली त्या सीतेच्या बोलण्यापेक्षां आमचें बोलणें फार वांकडें आहे कीं काय ?

अयुक्त=अयोग्य साकडें=संकट; तदुक्ती=त्या सीतेची उक्ती ही कोणची हें पुढील केकेंत सांगितलें आहे.

**जगत्रयमनोहरा बलगुणैकरत्नाकरा;**
**म्हण ' कनकरंकु द्या मज, महा प्रयत्ना करा,**
**प्रियाहि अशि जाहली तुज कुकार्य आज्ञापिती;**
**सुधा त्यजुनि कामुक प्रगट अंगनाज्ञा पिती. ८३**

हे सर्व जगांत मनोहर व बलादि गुणांचा मुख्य ( मोठा ) सागर अशा परमेश्वरा, ' मोठा प्रयत्न करा, पण मला तो सुवर्णाचा मृग आणून द्या, ' अशा प्रकारची वाईट कार्याची आज्ञा, सीता ही तुमची प्रिया असूनही तुम्हांस करिती झाली; आणि स्त्रीलंपट पुरुष जे आहेत ते अमृत टाकूनही स्त्रीच्या आज्ञेचें सेवन करितात हें स्पष्टच आहे; ( त्याप्रमाणें तुम्हींहि तिची आज्ञा ऐकिलीत. )

जगत्+त्रय+मनोहर=सर्व जगांत सुंदर; बल+गुण+एक+रत्नाकर=बलादि गुणांचा मोठा सागर; कामुक=स्त्रैण स्त्रीलंपट स्त्रीच्या नादीं असणारे.

**स्वदास समयीं जपे तरि न दे वरा चाकरी--**
**चुके न परि सार्थक श्रम न देवराचा करी;**
**वदेहि भलतेंचि, तें तिसचि, कोप टाका, पुसा;**
**असें मृदु म्हणोनि, बा, मज न धोपटा कापुसा. ८४**

आतां त्या तुमच्या प्रिय स्त्रीनें आपल्या दिराशीं कसें वर्तन केलें तें पहा---आपला दास म्हणजे दासासारखी सेवा करणारा जो लक्ष्मण, तो तिला योग्य समयीं जपत होता, तरी तिनें त्याला

वर ( सुखाचा शब्द ) दिला नाहीं; तो कधीं चाकरींत चुकला नाहीं, तरी तिनें त्या आपल्या दिराच्या श्रमांचें सार्थक केलें नाहीं; तर आणखी उलटें भलतेंच वदली; तें काय तें माझेवर न रागावतां तिलाच विचारा ( म्हणजे तुम्हांस कळेल. ) मी एक मऊ सांपडलों म्हणून मला [ गरीबाला ] उगाच थोपटूं नका.

देवर=दीर; वदे हि भलतेच=लक्ष्मणांस रामाचे मदतीस जाण्यास सीता सांगत असतां ' आहे हें स्पष्ट राक्षसच्छद्म ' असें सांगून लक्ष्मण जाईना; तेव्हां सीता त्यास ' वर्तते मदभिलाष मनांत, तूं तरीच शिरलास वनांत, ' असें म्हणाली.

न जें प्रिय, सदोष तें; प्रिय सदोषहि चांगलें;
स्वतोक पितरां रुचे, जरिहि कर्दमीं रांगलें;
तुलाचि धरि पोटिशीं कशि तदा यशोदा बरें ?
जरी मळविशी रजोमलिनकाय तूं अंबरें. ८५

जें आपल्यास आवडत नाहीं, त्याला आपण नांवें ठेवितों; व जें आवडतें, तें सदोष असलें तरी चांगलें वाटतें, आपले मूल जरी चिखलांत रांगलें, तरी तें आईबापांस आवडतें. तुझेंच उदाहरण पाहा; ( कृष्णावतारीं धुळीनें ज्याचें अंग मळलें आहे असा तूं जरी वस्त्रें मळवीत असस, तरी तुला यशोदा कशी बरें पोटाशीं धरीत असे ! ( तेव्हां एकंदरींत जगाची ही अशी रीतच आहे. )

तोक=मूल; कर्दम--चिखल; रजस्+मलिन+काय=रजानें ( धुळीनें ) मळलेला आहे काय ( शरीर ) ज्याचा बहु० स०

तुझे कथिति गोपिका विविध तीस बोभाट, ते—
सुखप्रद गुणस्तवापरिस जाहले वाटते;

क्षमा न करि एकदां, तरिहि फार खोडी करां;
न देचि भय, ताडनोद्यमसमेत सोडी करां. ८६

गोकुळांतल्या स्त्रिया तुमचीं नानाप्रकारचीं गाऱ्हाणीं तिला सांगत; परंतु तीं तिला गुणांच्या स्तवाप्रमाणेंच सुखकारक वाटत असत. एकदां तुम्हीं मोठीच खोडी केली, तेव्हां मात्र तिनें क्षमा केली नाहीं; तरी तेव्हां देखील तिनें कांहीं तुम्हांस मोठेसें भय दाखविलें नाहीं; तर तुमचे जे हात बांधले होते तेही सोडले, व तुम्हांस मारण्याचा जो उद्देश होता, तोही त्याबरोबरच सोडून दिला.

गुणस्तवापरिस=जसा काय गुणांचाच स्तव आहे असें; ताडन+उद्यम+समेत=ताडन करण्याच्या उद्योगाबरोबरच; हातही सोडिले व त्याबरोबर ताडन करण्याचा उद्योगही सोडिला.

जरी म्हणसि बांधिले, तरि न कष्टवीलें; करा—
विचार, जशि कष्टवा तशि न कष्टवी लेंकरा;
यथेष्ट पुरतें जरी प्रथम दाम कां सांधिती ?
न ती प्रबळ गोपिका; तुज तुझी दया बांधिती. ८७

आतां तुम्ही म्हणाल कीं, तिनें बांधलें होतें तर खरें ?—तर जरी बांधलें तरी तुम्हांस तिनें कांहीं फारसें कष्ट दिलें नाहींत; नीट आठवण करून पाहा; तुम्ही जसा तिला त्रास देत असा, तसा कांहीं कधीं तुम्हांला लेंकराला तिनें त्रास दिला नाहीं. तिनें जेव्हां तुम्हांस बांधिलें, तेव्हां पहिल्यानेंच जी दोरी तिनें घेतली होती, ती जर नीटपणें पुरली असती, तर तिला अणखी दोऱ्या सांधण्याचा त्रास कशाला पडला असता ? ( हा त्रास तिला तुम्हींच

दिला, अशी कवी आठवण देतो. ) सरतेशेवटीं तिनें तुम्हांस बांधिलें, पण त्यावरून ती गोपिका ( यशोदा ) प्रबळ होती असें कांहीं होत नाहीं; तर तुमच्या दयेनेंच तुम्हांला बांधलें. ( म्हणजे यःकश्चित् गोपिका तुम्हांस बांधणार कोण ? पण सरतेशेवटीं ती जेव्हां दावीं सांधवून सांधवून बांधतांना थकली, तेव्हां तुम्हांस तिची दया आली व शेवटचें दावें अखेरीस पुरलें; तेव्हां तुम्हांस तुमच्या दयेनेंच बांधलें, असें म्हणावयाचें ).

यथेष्ट=पुरेतपणीं, नेटिपणें; बांधितां=बांधतं परमेश्वराची भक्तांवरील दयाच त्यास नेहमीं बद्ध करिते. ' दयाघन भक्तीं अकाळिला ' असले उद्गार प्रसिद्धच आहेत.

तुम्हींहि बळि बांधिला, म्हणुनि आमुची माय जी——<br>
मनांत सहसा दया, निपट टाकिली काय जी—— ?<br>
सकोप दिसती गुरू क्षणभरीच; जें तापलें<br>
जल ज्वलनसंगमें, त्यजि न शैत्य तें आपलें. ८८

यशोदेनें तुम्हांस बांधलें, म्हणून तुमच्या बद्दलची तिच्या मनांतली ममता कांहीं तिनें टाकिली नव्हती; उदाहरणार्थ, तुम्हींही बळींचें बंधन केलें. म्हणून आमची केवळ माता अशी जी तुमच्या मनांतली दया, तिचा तुम्हीं अगदींच त्याग केला असें समजावयाचें कीं काय ? ( नाहीं; कारण तुम्हीं पुढें बळीवर मोठीच दया केली. ) थोर लोक ( किंवा वडील ) यांना राग आला तरी ते एक क्षणभर रागावतात; अग्नीवर ठेवल्यानें पाणी जरी तापले, तरी तें आपला स्वाभाविक जो थंडपणा, तो कांहीं टाकीत नाहीं ( तर लौकरच पुनः थंड होतें. )

सहजा=सह+जा=बरोबर जन्मास आलेली, म्हणजे स्वाभाविक; ज्वलन+संगम= अग्नीच्या संगतीनें, विस्तवावर ठेवल्यानें.

प्रसिद्ध तुमचे महासदय पाय; जीवांकडे —
चुकी म्हणुनि होतिल क्षणहि काय जी वांकडे ?
न निष्ठुर पिता; म्हणे मानें, ' न हो प्रजा टोणपी;
अपथ्यरुचिरुग्ण तो कटुक ओखदें कोण पी ? ८९

तुमचे पाय अत्यंत दयाळू अशी त्यांची प्रसिद्धी आहे; तेव्हां जीवांचे हातून जरी चुकी झाली, तरी ते क्षणभर तरी त्यांच्याशी वांकडे होतील काय ? ( प्राण्याचे हातून चुकी होणारच, परंतु तुम्ही फार दयाळू असल्यामुळें त्या चुकीबद्दल निष्ठुरपणानें शासन करणार नाहीं ). बाप आपल्या मुलांना शिक्षा करितो, पण ती कांहीं निर्दयपणानें करीत नाहीं, तर आपलीं मुलें टोणपीं निघूं नयेत, म्हणून करितो; पण ज्यास कुपथ्यकारक असे पदार्थ आवडतात, असा कोणचा रोगी मागाहून बरें होण्यासाठीं कडू औषध पिणार आहे ? ( तूं जी आम्हांस शिक्षा करितोस, ती आमच्या बऱ्याकरितां करितोस; पण एकाद्यास जसें प्रथम कुपथ्य करावयास पाहिजे व मग कडू औषध घ्यायला नको, त्याप्रमाणें आम्हांस प्रथमतः वाईट गोष्टी करावयास पाहिजेत, आणि मग त्यासाठीं तूं आम्हांस आमच्या हिताकरितांच—निष्ठुरपणानें नव्हे—जी शिक्षा करितोस, ती मात्र आवडत नाहीं, असा भाव ).

अपथ्य+रुचि+रुग्ण=अपथ्य म्हणजे खायचे नाहींत अशा प्रकारच्या पदार्थांची गोडी ज्यास आहे ( बहु० स० ) असा रोगी.

असंख्य खळ संगरी निजकरीं तुवां मारिले;
न निष्ठुरपणें, कृपा करुनि ते भवीं तारिले;
जगज्जनक तूं मुलें सकळ जीव यां भातुकें—
दटावुनि हि देशि बा; अमृत नेदिजे घातुकें. १०

तूं असंख्य दुष्ट लोक युद्धांत आपल्या हातानें मारिलेस. पण ते निष्ठुरपणानें—म्हणजे तुला त्यांना मारण्यांत मौज वाटावी असा तूं निष्ठुर आहेस म्हणून मारिले नाहींस, तर यांत त्यांचेवर कृपा करून त्यांना त्वा भवसागरांतून मुक्त केलेंस; तूं सर्व जगाचा पिता आहेस, आणि सर्व जीव हीं तुझीं मुलें आहेत; त्यांना तूं (प्रसंगीं) दटावतोस, पण दटावून मग ( मोक्षरूपी ) खाऊ देतोस; जो घात करणारा आहे तो कधींही अमृत देणार नाहीं ( आणि तूं तर ते अमृत—म्हणजे मोक्ष—देतोस, म्हणून तूं घात करणारा नव्हेस, तर आमचा हितकर्ताच आहेस ).

भातुक=खाऊ; नेदिजे=नदीजे, न द्यावें दीजे हे जुन्या भाषेंतले कर्मणि रूप आहे.

वरी प्रकट शांतिला धरि, परंतु मीना बकी—
गिळी; तशी तुला टपे सुकृतबुद्धिहीना बकी,
जिणें गरळ पाजिलें अमृत पाजिलें तसि तें,
खळासि न दिसो भलेपण खरें भल्या दिसतें. ११

बकी म्हणजे बगळी ही वरकांती स्पष्ट दिसणारी अशी शांतता धारण करिते परंतु मत्स्याला तो आटोक्यांत येतांच गिळते; तशी जिच्यामध्यें चांगली बुद्धि मुळींच नव्हती, अशी ती बकी

(पूतना राक्षसी) तुम्हांस [ तुमचा नाश करण्यास ] टपत होती; तिनें तुम्हांस [ आपल्या स्तनांतून भरून आणलेलें ] विष पाजिलें, पण तुम्हीं तिला तें मोक्षरूपी अमृत पाजिलें. अशा प्रकारचें तुमचें थोरपण कदाचित् दुष्टाला न दिसो, पण भला जो आहे त्यास खचित दिसतें.

सुकृत+बुद्धि+हीना=पुण्यबुद्धि म्हणजे चांगलें करण्याची बुद्धि, हिचा अभाव जिच्यामध्यें आहे, अशी बुद्धीनें हीन, असा तृतीयातत्पुरुष.

सदाहि हित नायकों. बहु अपाय केले करूं
तरि सकृप बाप तूं म्हणसि ' नायके लेंकरूं,
कधीं न करिसी प्रभो, भजकबाळकोपेक्षण
न तूजवरि ज्यापरी पशुपपाळ कोपे क्षण, ९२

आम्ही नेहमींच हिताची गोष्ट ऐकत नाहीं; आजपर्यंत पुष्कळ अहितकारक कृत्यें केलीं व हल्लीं करितों ( किंवा पुढें करूं ) असें असून तूं दयाळू बाप इतकेंच म्हणतोस कीं, हें पोर ऐकत नाहीं; हे देवा, तुझा भक्त हेंच जें बालक, त्याची उपेक्षा ( हयगय ) तूं कधींच करीत नाहींस;—ज्याप्रमाणें कृष्णावतारीं तूं इतक्या खोड्या करीत असस तरी गवळ्यांचा मुख्य जो नंद, तो तुझ्यावर क्षणभरही कधीं रागवत नसे.

अपाय=वाईट, अहितकारक गोष्टी; भजक+बालक+उपेक्षण=भक्तरूपी जें बालक त्याचें उपेक्षण म्हणजे हयगय; पशुप=गवळी, त्यांचा पाल म्ह० राजा, मुख्य असा नंद.

खरा जनक तूं, जना इतर कोण हो देव वी ?
समीहित फळें जगा तव पदाब्ज दे, देववी ;

**अशीच करुणा असो हरि कधीं न भंगो पिता;**
**अशा मज असाधुला इतर कोण संगोपिता;** ९३

हे हरी, तूंच आमचा खरा बाप आहेस, कारण इतर कोणता देव मनुष्यांस उत्पन्न करूं शकेल? तुझेंच पदकमल जगाला (म्हणजे जगांतील लोकांना) इच्छित फळ (स्वतां) देतें आणि (साधुलोकांकडून, तीर्थादिकांकडून, वगैरे) देवविते; व तुझें माझ्याशीं जें पित्याचें नातें आहे, तें भंग पावूं नये; कारण मी जो असा असाधु म्हणजे वाईट आहें, त्या माझें संगोपन [दुसरा] कोण करणारा आहे? [इतर कोणी माझा सांभाळ करणारा नाहीं, तर तूंच करिशील.]

समीहित=इष्ट, वांच्छित; पिता न भंगो=म्हणजे पित्याचे नातें नाहींस होऊं नये, या नात्याचा तुम्हांस विसर पडूं नये; संगोपिता=संगोपन—रक्षण—सांभाळ—करणारा.

**सुविद्य, धन मेळवी, वचन आयके, आवरी—**
**प्रपंच, भर घे शिरीं, करि कृपा पिता त्यावरी;**
**असा जरि नसे, रुचे तरि न तो अभद्र क्षण;**
**तसा तुजचि आवडे; करिसि तूंचि तद्रक्षण.** ९४

मुलगा जर विद्वान्,पैसा मिळविणारा, आज्ञा मानणारा, संसार आवरणारा, जबाबदारी आंगावर घेणारा, असा असेल, तर त्याच्यावर बापाची कृपा असते; तसा नसून जर दळभद्या असेल, तर तो बापास क्षणभर सुद्धां आवडत नाहीं; पण तसा पुत्र तुला

आवडतो [ म्हणजे तुझा भक्त कितीही वाईट असला तरी तो तुला आवडतो ] आणि तूंच अशाचें रक्षण करितोस.

सु-विद्य=चांगली आहे विद्या ज्याची, बहु० स०, अभद्र=करंटा, दळभद्री.

**पिता जरि विटे, विटो; न जननी कुपुत्रीं विटे;**
**दयामृतरसार्द्रधी न कुलकज्जलें त्या किटे;**
**प्रसादपट झांकिती, परि परा गुरूचे थिटे'.**
**म्हणूनि म्हणती भले ' न ऋण जन्मदेचें फिटे'.** ९५

बापाला वाईट मुलाचा वीट येतो, पण आईला येत नाहीं. कवी म्हणतो, मुलगा वाईट असला तर बाप त्याचा कंटाळा करितो, पण आई करीत नाहीं. दयारूप तो अमृतरस त्यानें आर्द्र [ त्यानें युक्त, म्हणजे दयायुक्त, ममताळू ] असें जिचें मन आहे, अशी ती आई, मुलगा जरी कुलकलंक असला, तरी त्याच्या योगानेंही मलीन होत नाहीं ; दुसरा गुरू [ म्हणजे वडील ] जो बाप, त्याचें प्रसादरूपी वस्त्र [ मुलाचे अपराधांवर] पांघरूण घालितें, पण तें वस्त्र आखूड पडतें; [ म्हणजे मुलगा वाईट असला तर बाप अमुक एक मर्यादेपर्यंत त्याचे अपराधांवर पांघरूण घालितो पण पुढें त्याचें नांव टाकतो. म्हणून साधु–शहाणे–म्हणतात कीं, जन्मदा म्हणजे आई. इचें ऋण कधीं फिटत नाहीं. (कवीचा) भाव असा कीं, हे परमेश्वरा तूं आईप्रमाणें आहेस; तुझा भक्त कितीही वाईट असला, तरी तूं त्याचेवर कृपा करितोस.

दया+अमृतरस+आर्द्र++धी=दयारूपी जो अमृतरस त्यानें आर्द्र म्हणजे ( ओली ) आर्द्र धी–बुद्धी–जीची, बहु० स० विटणें=मलीन होणें, कंटाळणें

पर-गुरु-गुरू म्हणजे वडील माणसें आई व बाप अशीं दोन; पैकीं आईबद्दल अगोदर सांगितलें, तेव्हां पर--दुसरा--गुरू म्हणजे बाप; प्रसाद-पट=दयेचें पांघरूण; थिटें= आंखूड, शेवटपर्यंत न पुरणारें; ( पट याचें विशेषण ).

विटेल जननीहि कीं शत रची निमित्तें विधि;
मळे कलियुगीं श्रुती जशि खळीं तिची तेवि धी—
कदाचित विटेल, बा, तव दया न दीनावरी;
जशी जगदघक्षयीं कर भवन्नदी नावरी. ९६

परमेश्वर मातेपेक्षांही श्रेष्ठ आहे, अशा उद्देशानें कवि म्हणतो— परमेश्वरा, हें दुर्दैव शेंकडों कारणें उत्पन्न करितें, तेव्हां ( त्यांतलें एकादें कारण उपस्थित होऊन ) या कलियुगांत जसे वेदही भ्रष्ट झाले, तशी वाईट पुत्राचे ठायीं आईची मतीदेखील कदाचित् भ्रष्ट होईल; परंतु तुझी नदी जी भागीरथी ती जशी जगाच्या पातकांचा क्षय करण्यांत आपला हात आवरीत नाहीं, त्याप्रमाणें दीनावरची तुझी दया विटत ( कमी होत ) नाहीं.

कलियुगीं श्रुति=वेद जे दुसऱ्यास पवित्र करणारे, ते देखील या कलियुगांत अपवित्र झाले, कारण यवनादिकांच्या मुखीं गेलें; जगत्+अघ+क्षयीं=जगाच्या पातकाचा क्षय करण्यांत.

कृपाचि जननी तुझी, सकल जीव दायाद; या—
तिणेंचि उपदेशिल्या करिति सर्व दाया दया;
असें उमजतां भले न गुरुभाव तो टाकिती;
मता तुजसि गोपिका, मग जनास तोटा किती ? ९७

वास्तविक म्हटलें तर तुझी कृपा हीच खरी आई असून सर्व जीव तिचीं लेंकरें आहेत. आणि आमच्या या ज्या जगांतल्या

आया, या केवळ दाया म्हणजे उपमाता असून, या आमच्यावर दया करितात ती त्या तुझी–कृपारूप खऱ्या मातेच्या उपदेशावरून शिकून करितात; भले लोक असा प्रकार समजतात, तथापि जगांतल्या आईच्याबद्दलची जी आपली पूज्यबुद्धि, तिचा त्याग करीत नाहींत; कारण तुला देखील जर यशोदा ही खरोखरी तुझी उपमाता असून मान्य झाली होती, तर मग आपल्या प्रत्यक्ष जन्मदात्या आईलाच आई म्हणण्यांत साधारण जनांचा काय तोटा होणार आहे ?

दायाद=मुलगे; आप्त असाही अर्थ आहे; तिनेंचि उपदेशिल्या इ०--जगांतल्या आया, मुलावर करावयाची ममता ही परमेश्वरकृपेवरून शिकतात, असा भाव गुरूभाव--आईबद्दलची पूज्यबुद्धि; गोपिका--गोपस्त्री यशोदा; मता=मान्य.

**भरोनि कुचकुंभ जी विषरसें मुखीं दे बकी;**
**प्रभो तिसहि ठेविशी जशि महासुखीं देवकी;**
**न होति जननी कशा पशुपदार, गाई ? लया—**
**न पावतिच तत्सुखें, कृति न कोण गाईल या ? ९८**

हे प्रभो, जिनें प्रत्यक्ष मातेप्रमाणें पालन केलें त्या यशोदेची गोष्ट राहो, पण जी पूतना राक्षसी आपल्या स्तनामध्यें विष भरून तुम्हांस पाजण्यास आली, तिला देखील प्रत्यक्ष देवकी ( जी तुमची आई, ती ) प्रमाणें सुखांत ठेविलीत, ( मोक्ष दिलात ); अशा रीतीनें तुमचा घात करूं पाहणारी पूतनादेखील जर आईप्रमाणें झाली, तर गवळ्यांच्या स्त्रिया व गाई या ( तुमच्यावर जर ममताच करीत होत्या व त्यांचें तुम्हीं दुग्धपानच केलें, तर )

आया कशा होणार नाहींत ? त्यांना तर तुम्हीं अशी स्थिति दिली असेल कीं, त्यांचीं सुखें कधीं संपणारच नाहीं ! अशा प्रकारचीं जीं हीं तुमचीं चरित्रें तीं कोण गाणार नाहीं ?

कुच+कुंभ स्तनरूपीं कुंभ; कर्मधारय; देवकी–वसुदेवाची स्त्री, कृष्णाची खरी आई; पशुपदा=गवळ्यांच्या स्त्रिया; दार हा शब्द संस्कृतांत स्त्रीवाचक असूनही पुल्लिंगी, व निरंतर अनेकवचनी असतो; कृति=हीं तुझीं दयेचीं व उपकार फेड-ण्याचीं कृत्यें.

अशी तरि कृतज्ञता हरि तुझ्याच ठायीं अगा !
सख्या, अणुचि, मानिशी, करुनि सुप्रसादा अगा;
भुले सुकविवाग्वधू तव गुणा अनर्घ्या नगा;
म्हणेल जन कोण, कीं यश पुनःपुन्हा तें न गा ? ९९

हे हरी, अशा प्रकारची ही ( मागील केकांत वर्णिलेली ) कृत-ज्ञता ( उपकार फेडण्याची बुद्धि ) तुझ्याच ठिकाणीं सांपडेल; तूं पर्वतप्राय मोठे प्रसाद करून त्यांना अणुमात्र मानितोस; यामुळें सुकवीची वाणी अथवा कविता हीच कोणी नवरी, ही तुझे गुण, हाच कोणी जो अमोल दागिना, त्याला भुलते, ( म्हणजे अर्थात् तो दागिना, ज्याच्यापासून प्राप्त होईल, त्या तुला भुलते ) अशा प्रकारचें जें तुझें यश तें पुनः पुनः गाऊं नये असें कोण मनुष्य म्हणेल ?

अणु=अगदीं लहान, अल्प; अग=पर्वत; सु+कवि+वाग्+वधू=चांगल्या कवीची वाणी हीच कोणी नवरी.

तुम्ही बहु भले, मला उमज होय ऐसें कथा;
कसा रसिक तो ? पुन्हा जरि म्हणेल आली कथा;

प्रतिक्षण नवीच दे रुचि, शुकाहि संन्यासिया;
न मोहिति भवत्कथा अरसिका अधन्यासि या. १००

तुम्ही म्हणाल कीं, रोज रोज या कथांत तुला गोडी काय वाटते? तर तुम्ही सुज्ञ आहां, तुम्हीच मला नीट समजून सांगा कीं, एकादी कथा 'पुनः आली' असें जो म्हणतो, तो रसिक कसला? शुकासारख्या संन्याशाला देखील तुमच्या कथांमध्यें प्रत्येक क्षणीं नवीन गोडी वाटते; अधन्य म्हणजे दुर्दैवी असा जो अरसिक, त्याला मात्र तुमच्या कथा मोहित करीत नाहींत.

उमज=समजूत; रसिक म्हणजे रस जाणणारा; प्रतिक्षण नवीनच दे रुचि ह०= एकाद्या पदार्थाची खरी रमणीयता हीच कीं, प्रत्येक क्षणीं तो पदार्थ नवीनच वाटावा; सन्यासी=सर्वत्याग ज्यानें केला आहे असा.

कथा श्रवणचत्वरीं जरि पुनः पुन्हा ये, रते—
महारसिक तद्रसीं, विटति ऐकतां येर ते;
विलोकुनि विलासिनीजन पुनःपुन्हा कामुका
करी वश, नव्हे बुळा, विवश घेइना कां मुका! १०१

भगवत्कथा कर्णरूपी अंगणांत पुनः पुनः जरी प्राप्त झाली, तरी रसिकजन तिच्या ठायीं रममाण होतो; येर म्हणजे अन्य, अर्थात् जो रसिक नव्हे, त्याला त्याच त्याच कथा पुनः पुनः ऐकून वीट येतो; याला दृष्टांत काय, तर विलासिनी जन म्हणजे विलासवती स्त्रिया कामी पुरुषाला त्याचेकडे पुनः पुनः केवळ अवलोकन करूनच वश करितात; परंतु एकादा पुरुष जर षंढ असेल, तर विलासवतीनें जरी निःशंकपणें त्याचा मुका घेतला, तरी देखील तो वश होणार नाहीं.

श्रवण+चत्वर=श्रवणरूपी अंगण; भगवत्कथा नाचावयास येते, अशी कल्पना करून कानास अंगणाची उपमा दिली; कामुक=शृंगाररसज्ञ पुरुष; विवश=निःशंकपणें, निर्भिडपणें.

कथा सुपुरुषा तुझी वश तशा करी, राधिका—
जशी तुज जिला स्वयें म्हणसि तूं शरीराधिका;
तिचें न घडतां, रमाहृदयवल्लभा, सेवन—
प्रभो, तुज जसें, तसें मतिस गेह भासे वन. १०२

हे रमेच्या हृदयाला आनंद देणाऱ्या प्रभो, जिला तूं स्वत आपल्या शरीरापेक्षां श्रेष्ठ असें म्हणत असस, ती राधिका जशी तुला वश करी, तशी तुझी कथा सज्जनास वश करितें; राधेचा सहवास घडला नाहीं, तर तुला जसें घर अरण्याप्रमाणें वाटे त्याप्रमाणेंच भगवत्कथेचें सेवन न घडलें तर आम्हांसही वाटतें.

शरीर+अधिक=शरीरापेक्षां श्रेष्ठ; रमा+हृदय+वल्लभ=लक्ष्मीच्या हृदयाला प्रिय; तुम्हांस एक लक्ष्मी प्रिय असतांही आणखी राधा इतकी आवडत असे असा भाव.

कथा भुवनमोहिनी अशि न मोहिनी होय ती;
हरो असुरधी; हिणें भुलविले किती हो यती ?
नव्हे न म्हणवे; असो जरि विमोहिला दक्षहा,
प्रिया बसविली शिरीं, मुनिपथीं कसा दक्ष हा ! १०३

तुमची कथा सर्व भुवनाला भुलवणारी आहे, तसें तुम्हीं जें मोहिनी स्वरूप धारण केलें तेंहि नव्हतें; त्या मोहिनीनें दैत्यांचें मन मोहित केलें खरें पण या कथेनें किती तरी साधु भुलवून सोडले आहेत ( तेव्हां हिचा मोह मोठा आहे ) ; कारण दैत्यांसारख्यांचें मन

हरण करणें फार कठीण नाहीं साधूंना मोहित करणें फार कठीण; आतां तुम्ही म्हणाल कीं, दक्षाला मारणारा असा जो महातामसी शंकर त्याला देखील त्या मोहिनीनें भुरळ घातली नाहीं काय? होय घातली, मी कुठें नाहीं म्हणतो? परंतु ज्यानें आपली बायको [ गंगा ] डोक्यावर बसविली आहे. तो हा शंकर मुनिधर्मीत कितपत दक्ष म्हणावयाचा? (म्हणजे असला बाईलवेडा जो शंकर त्याला तिनें भुलविलें, म्हणून नवल काय झालें? त्याची व मुनींची कांहीं तुलना नाहीं असा भाव ).

भुवन—मोहिनी=जगास भुलविणारी; मोहिनी=दैत्यांस फसविणारी; ( दैत्यांना अमृतपानाचे वेळीं फसविण्यासाठीं विष्णूने जें स्त्रीरूप धारण केलें होते, ती मोहिनी) तिला शंकरसुद्धां फसले; दक्ष हा=दक्षप्रजापति शंकराचा सासरा त्याला शंकरानेंच मारिलें,

सुरासुरनरोरगां भुलवुनी कथा न त्यजी  
न भेद करि पंक्तिचा अमृत पाजिती सत्य जी;  
तिनें जरि सुधारस स्वरतमानसां पाजिला,  
वधी अमृत घोटितां, द्रव न येचि बापा! जिला. १०४

कथा व मोहिनी यांची तुलना करीत होत्साता कवि म्हणतो:— ही जी कथा ती देव, दानव, मनुष्य, नाग वगैरे यांस प्रथमतः भुलवून मग त्यांचा त्याग करीत नाहीं, पंक्तिभेद म्हणजे एकावर कृपा करावी व एकावर करूं नये, असें ही करीत नाहीं; व खरोखरीचें अमृत पाजितें [ म्हणजे मोक्ष देते ]; पण ती जी मोहिनी, तिनें तिला जे भुलले असे जे दैत्य त्याना जरी अमृतरस पाजिला,

तरी तें अमृत पीत असतांनाच तिनें त्यांचा वध केला; हे देवा, असें काम करितांना तिला दया आली नाहीं.

देव–दैत्यांना अमृत पिण्यास बसवून विष्णू मोहिनीच्या रूपानें त्यांस अमृत वांटीत होता; तेव्हां राहू व केतु हे दैत्य देवांचें रूप धरून त्यांच्यामध्यें बसले; त्यांना अमृत दिलें; परंतु त्यांचें खरें स्वरूप कळून येतांच तें अमृत पीत असतांना त्यांचा वध केला. हा कथासंबंध येथें आहे. पंक्तिप्रपंच म्हणजे देवांना अमृत द्याव-याचें व दैत्यांना न द्यावयाचें हा. स्वरत–मानस=आपल्यास भुललेलें स्वरत आहे मानस ज्यांचें बहू०स०

अभीष्ट वरितात जे तव कथेस विश्वासती;
भली असुरवंचनी श्रुत असेंचि विश्वास ती;
कथा कशि सखी तिची ? ठकवुनी हरी संचितें
तरी अमृत दे असें सदय दाखवा वंचितें १०५

या केकेंतही कथा व मोहिनी यांची तुलना केली आहे. कवि म्हणतो:—जे तुझ्या कथेवर विश्वासून असतात, त्यांना इच्छित प्राप्त होतें; आणि ती ( मोहिनी ) असुरांना फसविणारी म्हणून साऱ्या जगाला चांगली माहीत आहे; तेव्हां तुमची कथा ही तिची सखी, म्हणजे तिच्यासारखी कशी होईल ? कथा ठकविते, पण ठक-वून संचित म्हणजे पूर्वकर्मार्जित जीं फळें तीं हरण करिते, म्हणजे त्यांचा नाश करिते, व अमृत म्हणजे मोक्ष देते; पण दुसरी जी मोहिनी ती फसवून सदयपणा वरवर मात्र दाखविते, पण आंतून गळा कापिते.

अभीष्ट=इच्छित; संचितें=पूर्वजन्मार्जित कर्में पूर्वजन्मार्जित जें जें वाईट प्राप्त झालें असतें, तें मनुष्यांना हितकारकच आहे असें वाटत असतें; तें त्यांना

सोडावेसें वाटत नाहीं. कथा जनांना फसवून तीं संचित फळें हरण करून मोक्ष देते; म्हणून चांगलें देऊन वाईट काढून घेते. पण मोहिनीनें काय केलें, तर सुंदर रूप धारण करून 'आपण मोठी दयाळू' असें वरवर दाखविलें, व नांवाला अमृत देऊन त्याचेंच हरण केलें; म्हणजे दैत्य अमृत पीत असतां त्यांना मारिलें; असा त्या दोघींच्या वर्तनातला फरक दाखविला आहे.

करा श्रवण येवढें, अपटु लोक हासो मला;--
अहो, जरि गिळावया प्रियकुमार घे सोमला,
तयासि ठकवूनि दे बहुत शर्करा माय जी,
तिला स्वशिशुवंचनें अदयता शिवे काय जी. १०६

जो लोकांना फसवितो, तो दयाळू कसा? अशी शंका कोणी घेईल, म्हणून कवि त्या शंकेचे निवारण करण्याच्या उद्देशानें म्हणतो—अडाणी लोक मीं जें हें वर म्हटलें आहे, त्यांवरून मला हांसतील; पण मी काय म्हणतों हें ऐवढें तुम्ही [ कांहीं अडाणी नाहीं यासाठीं ] ऐकून घ्या. समजा कीं, एकाद्या आईचा आवडता मुलगा आहे, आणि त्यानें सोमल हातांत घेतला आहे व तो आतां खाणार, तेव्हां आई काय करिते? तर त्या सोमलासारखी दिसणारी जी साखर ती पुष्कळशी त्याचे हातावर आणून देऊन त्याला ठकवून तो सोमल युक्तीनें त्याचेपासून काढून घेते; तर अशा रीतीनें आपल्या मुलास ठकविल्याबद्दल तिला निर्दयी म्हणतां येईल काय?

अपटु=अडाणी; सोमल=एक प्रकारचा विषारी खनिज पदार्थ; हा बऱ्याच अंशीं साखरेसारखा दिसतो; स्व-शिशु-वंचन=आपल्या मुलाला फसविणें.

म्हणोनि बहु मोहिनीहुनि भली कथा हे तुजी,
अभीष्ट फल द्यावया नतमनोरथा हेतु जी;

म्हणाल जरि, मीच त्या, विषम काय दोघींत रे ?
जसा जन सिताऽसिताभिधनदीसदोघीं तरे. १०७

यासाठीं तुझी कथा त्या मोहिनीहून भली आहे; कारण ती शरण आलेल्याच्या मनोरथांना इच्छित फल द्यावयास कारण आहे. आतां कदाचित् तुम्ही असें म्हणाल कीं, "अरे कथा झाली तरी मीच, व ती मोहिनी तरी मीच झालों होतों; मग दोघींत अंतर कसें असणार ? जिचा ओघ शुभ्रवर्ण आहे अशी गंगा व जिचा ओघ काळा आहे अशी यमुना, या दोघींतही स्नान करून लोक तरतात." ( म्हणजे ज्याप्रमाणें गंगा-यमुना यांचे पाण्याच्या रंगांत भेद असला, तरी त्यामध्यें तीर्थत्व म्हणून जें, तें एकच आहे, त्याप्रमाणें कथा व मोहिनी हीं एकाच देवाचीं रूपें आहेत, तेव्हां त्यांत भेद कसा असणार ? )

नत्+मनोरथ=शरण आलेल्यांची इच्छा; विषम=वि+सम=भेद; भिन्नभाव. सित+असित+अभिध+नदी+सत्+ओघ=सित=पांढरा, असित=काळा; अशीं ज्यांचीं अभिधा म्हणजे नांवें आहेत, अशा ज्या नद्या ( गंगा-यमुना ) त्यांच्या उत्तम प्रवाहांत गंगेचें पाणी शुभ्रवर्ण व यमुनेचे काळसर आहे. त्यांच्या संगमाच्या ठिकाणीं हा रंगाचा भेद सुंदर रीतीनें दृष्टीस पडतो.

अहा ! बहु विशुद्ध हे प्रभु ! तव स्वरूपाहुनि,
न भिन्नतनु त्या; भले भजति, एकता पाहुनि;
परंतु वदतो जनानुभव, नातळो पाप गा ?
तशी न यमुना गमे, जाशि गमे निर्लिपापगा. १०८

हे प्रभो, काय सांगूं, तुम्हीं कांहीं म्हणा, पण तुमचें तें जें मोहिनी नांवांचें स्वरूप त्याहून ही कथा फार शुद्ध आहे; गंगा

यमुना यांची उपमा येथें उपयोगी नाहीं; कारण त्या गंगा, यमुना ( या कथा व मोहिनी जितक्या भिन्न आहेत ) तितक्या कांहीं भिन्न नाहींत;व त्यांचें एकस्वरूप ध्यानांत आणून भले लोक त्यांना सारखेच भजतात; परंतु मी जनांचा खरा अनुभव सांगतों; तो असा कीं, देवनदी जी भागीरथी ती जितकी लोकांना पवित्र वाटते, तितकी कांहीं यमुना वाटत नाहीं;हीं–मीं खरी गोष्ट सांगितली; असें मी म्हणतों याबद्दल [ यमुनेची निंदा केल्यामुळें ] मला पाप लागूं नये.

वि–शुद्ध=फार शुद्ध; भिन्न–तनु=ज्यांचें स्वरूप निराळें आहे अशा; न+आतळो =न शिवो; न लागो; निलिंप+आपगा=निलिंप=देव त्यांची नदी भागीरथी.

जगद्गुरुमहेश्वरप्रभुशिरीं जिचें नांदणें.
जिच्या जळमळे तुळे न शरदिंदुचें चांदणें,
प्रजा हरिहरां अशा यदुदरीं अनेका; कवी—
भिऊनि म्हणतील कां, ' जशि सुधा तशी काकवी. '
१०९

लोक गंगेला यमुनेहून श्रेष्ठ कां म्हणतात, तर त्या गंगेचें जगाचा स्वमी जो महेश्वर ( शंकर ) त्याच्या शिरीं नांदणें आहे; तिच्या पाण्यावरचा फेंससुद्धां इतका स्वच्छ आहे कीं, शरदृतूंतील चंद्राचें जें चांदणें तें देखील त्याचेसारखें होणार नाहीं; तसेंच जिच्या उदरीं विष्णु व शंकर यांसारखी प्रजा पुष्कळ पुष्कळ झाली आहे [ गंगेंत ज्यांना मरण येतें, तें विष्णुरूप व शिवरूप बनतात, म्हणून असें म्हटलें आहे ]; तेव्हां अशी स्थिति जर आहे, तर

शहाणे जशी सुधा तशीच काकवी असें आपलें उगाच भिऊन म्हणतील कीं काय ?

जगद्+गुरु=महेश्वर+शिरीं=जगाचा स्वामी जो शंकर, त्याचे मस्तकावर; शंकरानें गंगा मस्तकीं धारण केली आहे, हें सुप्रसिद्धच आहे. शरद्+इंदु=शरद्-ऋतूतलें चांदणें फार निर्मळ असतें. भिऊनि=उगाच घाबरून, किंवा केवळ भिडेस्तव

तुला स्वयमुनेसवें कुवलयद्युतिश्यामला—
म्हणाल जरि मोहिनी निजतनू, अवश्या मला,
तुलीन अमृतोदधिप्रभवपुंडरीकामला—
कथा सुरधुनीसवें, सुजन जींत विश्रामला. ११०

हे देवा, कुवलय म्हणजे नीलकमल, त्याचे तेजाप्रमाणें नीलवर्ण असें तुमचें स्वरूप जी मोहिनी, तिची यमुनेबरोबर तुलना ( करावी ) म्हणाल, तर ती तुलना मला कबूल आहे; [ कारण यमुना ही कुवलयद्युतिश्यामलाच आहे ]; पण अमृतसमुद्रांत उत्पन्न झालेलें जें श्वेतकमल, त्याप्रमाणें निर्मळ किंवा शुभ्र जी कथा, जींत सुजनांना विश्रांति मिळते, तिची तुलना मी देवनदी जी गंगा, तिच्याशींच करणार.

कुवलय=नीलकमल व पुंडरीक=श्वेतकमल. यमुनेचा रंग काळा व गंगेचा शुभ्र आहे; व मोहिनी शामवर्ण व कथा स्वच्छ, निर्मळ. अवश्या=कबूल; तुला=तुलना करण्यास योग्य; हें 'निजतनू' याचें विशेषण अथवा 'तुला' म्हणजे तुलना करा ( असें ) म्हणाल, असा अर्थ करून क्रियापद समजावें. अमृत+उदधि+प्रभव +पुंडरीक=अमृतसमुद्रांत उत्पन्न झालेलें शुभ्र कमल. सुरधुनी=देवांची नदी, गंगा. 'सुजन जींत विश्रामला'—हें कथा व गंगा या दोहोंकडेही घेतां येईल.

शुकोदित पुराण ज्या श्रवण सन्मुखें साग्रही,
म्हणल 'अतुला कथा' आणि म्हणाल, 'तो आग्रही;'

न केवळ मलाचि हे निरुपमा, यशोमंडिता,
गुरूसहि गमे, पुसा स्ववरदा महापंडिता. १११

अन्वय—ज्या शुकोदित पुराण सन्मुखें साग्रही श्रवण, [ तो ] ‘ कथा अतुला ’ म्हणेल; आणि म्हणाल, ‘ तो आग्रही; ’ मलाची केवळ हे [ कथा ] निरुपमा यशोमंडिता न [ गमे; तर ] स्ववरदा महापंडिता गुरूसही गमे, पुसा.

शुकानें सांगितलेलें पुराण ज्यानें साधुमुखानें श्रवण केलें आहे, असा कोणीही मनुष्य कथेला तुलना नाहीं असेंच म्हणेल; पण तुम्ही लगेच त्याला आग्रही म्हणाल; तर ही तुमची कथा, जिला उपमा नाहीं अशी व पतितांचा उद्धार केल्यामुळें कीर्तीनें सुशोभित अशी मलाच केवळ वाटते असें नाहीं, तर तुमच्यावर कृपा करणारा व महापंडित असा तुमचा जो गुरु सांदीपनी, त्यालाही अशीच वाटते; पाहिजे तर विचारूनच पहा.

सत्+मुखं=साधूंच्या मुखानें. यशोमंडिता ( कथा )=पतितांचा उद्धार केल्याचें जें यश, त्यानें सुशोभित. गुरू=कृष्णाचा गुरू सांदीपनी नांवाचा होता; त्याचेजवळ कृष्ण, बळराम, सुदामदेव यांनीं विद्याभ्यास केला.

प्रभो तुज न मोहिनी भुलवि; मोहिला तोहि ती—
त्यजी जन; नव्हे तशी, तुज तुझी कथा मोहिती;
निजानुभव तूं पहा; जशि महौषधी पारदा,
तुला स्थिर बळें करी, कळविलें तुवां नारदा. ११२

अन्वय—प्रभो, तुज मोहिनी न भुलवी; ती [ मोहिनी ] मोहिला तोहि जन त्यजी; ( पण ) तुझी कथा तशी नव्हे. [ ती ]

तुज मोहिती; तूं निजानुभव पहा; जशि महौषधी पारदा, [ तशी ] तुला [ तुझी कथा ] बळें स्थिर करी; तुवां नारदा कळविलें.

हे प्रभो, तुमची कथा मोहिनीपेक्षां श्रेष्ठ आहे; कारण मोहिनीनें जरी दुसऱ्यांना भुलविलें, तरी तुला भुलविले नाहीं व मोहिनीनें ज्यांना भुलविलें त्यांचाहि तिनें पुढें त्याग केला; पण तुझी कथा तशी नाहीं. ती ज्यांना भुलविते त्यांचा त्याग करीत नाहीं, तर त्यांचें शेवटपर्यंत कल्याण करिते; शिवाय ती तुलाही भुलविते; हें खरें, कीं खोटें याचा अनुभव तूंच पहा. ज्याप्रमाणें पाऱ्याला महान् औषधि बळानें स्थिर करितें, त्याप्रमाणें तुम्हीं जे चंचल, म्हणजे एका जाग्यावर कधीं स्थिर नसणारे,त्यांना तुमची कथा स्थिर करिते; तुम्हींच असें नारदास सांगितलें आहे. [ नारदास काय सांगितलें हें पुढील केकेंत आहे ].

महौषधी, इत्यादि=पारा अत्यंत चंचल आहे; पण तो औषधासाठीं तयार करितांना कित्येक वनस्पतींच्या जोरावर स्थिर करितां येतो.

**सुरर्षिजवळीं स्वयें वदसि. 'तत्र तिष्ठामि;' या—**
**तुझ्याचि वचनें म्हणें तुज कथावश स्वामिया !**
**जसा स्थिर कथेंत तूं , स्थिर करीं तसें या मना;**
**स्वभक्तसुरपादपा, सफल हे असो कामना. ११३**

हे आपल्या भक्तांना कल्पवृक्षासारख्या माझ्या स्वामी देवा, 'माझे भक्त माझ्या कथा जेथें गातात तेथें मी असतों' असें तुम्हीं देवर्षि जो नारद त्याला सांगितलें आहे, त्यावरूनच मी तुम्हांस 'कथेला वश होणारा' असें म्हणतों; तर हे देवा, तूं जसा कथेंत स्थिर

अ नतोस, तसेंच हें माझें मन स्थिर राहील असें कर; ही माझी इच्छा तृप्त होवो.

तत्र–तिष्ठामि=तेथें उभा असतों. सुरर्षि=देवर्षि––नारदास देवर्षि असें म्हणतात. स्वभक्त+सुर+पादप=आपल्या भक्तांना कल्पवृक्षाप्रमाणें—इच्छिलें देणारा.

सुरर्षि म्हणतो, ' तुझें यशचि धन्य; यो गायना—
मला कवि म्हणोत ते सुखद अन्ययोगायना; '
विमुक्तिबहुसाधनें तादितरें गणीनाच तो;
सजूनि वरवल्लकी तव सभांगणीं नाचतो. ११४

देवर्षि जो नारद, तो म्हणतो कीं, " तुझें यशच श्रेष्ठ आहे; तें माझ्या गायनाला यावें ( म्हणजे मीं गावें ). योगादि दुसरे मार्ग सुखकर आहेत असें कवि म्हणजे शहाणे पाहिजे तर म्हणोत; ( पण मला तसें वाटत नाहीं ). " तो नारद मुक्तीचीं जीं दुसरीं पुष्कळ साधनें सांगतात, तीं मानीत नाहीं; तर उत्तम प्रकारची वीणा सज्ज करून तुमच्या सभेमध्यें ( तुमच्या म्हणजे तुमच्या साधुजनांच्या सभेंत तुमचें कीर्तन करीत ) नाचत असतो !

मला गायना यो=मला गायन करण्यास येवो, गातां यावें. अन्य+योग+अयन =दुसरे योगादिक अयन म्हणजे मार्ग. विमुक्ति+बहु+साधनें=मुक्तीचीं दुसरी पुष्कळ साधनें. वल्लकी=वीणा.

तुझें चरित सन्मुखें श्रवण जाहलें, यास्तव—
प्रजापतिसुतत्व यें; करिति साधु ज्याचा स्तव;
स्वनीचपण मागिलें बहु दया अशी नारदा—
स्मरे घडिघडी, प्रभो ! भवपयोधिच्या पारदा. ११५

हे भवसागराच्या पार पोंचविणाऱ्या प्रभो, तुझें चरित्र साधूच्या मुखानें श्रवण झालें, यामुळें आपल्यास ब्रह्मदेवाचे पासून जन्म प्राप्त झाला, आणि आपण साधूंना मान्य झालों; अशा रीतीनें आपलें मागलें नीचपण व तुम्हीं केलेली बहुत दया या गोष्टी नारदास घडोघडी स्मरतात.

प्रजापति+सुतत्व=ब्रह्मदेवाचें पुत्रत्व; नारद हा ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांपैकीं आहे. स्वनीचपण मागिलें=नारद हा मागील जन्मीं दासीपुत्र, नीचकुलोत्पन्न होता, तो भजन केल्याच्या पुण्याईच्या योगानें ब्रह्मदेवाचा पुत्र झाला. नारदा स्मरे=नारदास आठवतें. येथें ' स्मरे ' याचा ' आठवतें ' अशा अर्थी उपयोग केला आहे.

तुझें यशचि तारितें, परि न केवला तारवे;
सहाय असिला असे, तरिच शत्रुला मारवे;
न भागवत भेटतां, न घडतांहि सत्संगती,
न अज्ञहृदयें तशीं तव यशोरसीं रंगती. ११६

तुझेंच यश आम्हास तारितें; परंतु केवळ तुझ्या यशानेंच कांहीं आमचें तारण होणार नाहीं. जरी तरवार शत्रूला मारते, तरी तिला सहाय असेल तरच तिच्यानें तें काम होईल, ( म्हणजे तरवारीला हातांत धरणारा असल्याखेरीज नुस्ती तरवार काय करील ? ) त्याचप्रमाणें भगवद्भक्त भेटला नाहीं किंवा साधूंची संगति घडली नाहीं, तर आम्हां अज्ञजनांचीं मनें तुझ्या यशरूप रसामध्यें रममाण होणार नाहींत. सारांश, तुझ्या यशाचे योगानें आम्ही तरूं हें जरी खरें, तरी त्या यशाचा तारणाचे कर्मीं कसा उपयोग करावा, हें शिकविण्यास साधूंचें सहाय पाहिजे. )

केवला=एकट्या ( यशा )लाच.

बुडे, बुडवि सागरीं तरि, सुकर्णधाराविना;
सहाय नसता स्वयें परतटासि ती दाविना;
सहाय भगवज्जना तव सुकीर्ति जेव्हां करी,
तईंच उतरी भवोदधितटीं जना लौकरी. ११७

नौका ही उत्तम प्रकारच्या नाविकाचें साहाय्य नसल्यास स्वतः सागरीं बुडते व दुसऱ्यासही बुडविते; तिला जर सहाय्य नसेल तर ती कांहीं स्वतां होऊन परतीरास घेऊन जाणार नाहीं; त्याचप्रमाणें तुझी सुकीर्ति जी आहे. ती भगवभक्ताचें जेव्हां साहय्य घेत, तेव्हांच ती लोकांना या संसारसागराचे परतीरास नेऊन लवकर उतरते.

तरि=नौका; सु-कर्णधार=चांगला नांवाडी.

सुसंगती सदा घडो सुजनवाक्य कानीं पडो,
कलंक मतिचा झडो, विषय सर्वथा नावडो;
सदंघ्रिकमळीं दडो, मुरडितां हटानें अडो,
वियोग घडतां रडो, मन भवच्चरित्रीं जडो ! १०८

हे परमेश्वरा, मला नेहमीं साधूंची संगती घडावी; सज्जनाचें बोलणें नेहमीं माझ्या कानावर यावें;बुद्धीचा सर्व मळ झडून जावा; विषय मुळींच आगडूं नये, माझ्या मनानें साधूंच्या पदकमलांचा आश्रय करावा; तेथून त्यास कोणी काढून लावूं लागल्यास त्यानें ( मनानें ) हट्टानें अडून बसावें साधूंच्या पदकमलांचा त्याला वियोग झाल्यास त्यानें शोकाकुल व्हावें; व माझ्या मनानें तुमच्या कथेंत आसक्त होऊन राहावें.

सु+संगति=चांगल्या लोकांची संगति; मतीचा कलंक=पाप; सत्+अंघ्री+कमल=साधूचा पाय हेंच कोणी कमळ; मुरडितां=एकीकडे काढिलें असतां.

न निश्चय कधीं ढळो, कुजनविघ्नबाधा टळो;
न चित्त भजनीं चळो, मति सदुक्तिमार्गीं वळो,
स्वतत्त्व हृदया कळो, दुरभिमान सारा गळो,
पुन्हा न मन हें मळो, दुरित आत्मबोधें जळो. ११९

माझा निश्चय नेहमीं दृढ असावा; दुष्ट लोकांनीं आणलेल्या विघ्नांची बाधा मला होऊं नये. भजनाचे वेळीं मन चंचळ असूं नये; माझ्या मनानें साधुंनीं सांगितलेल्या मार्गानें जावें; आपलें तत्त्व ( आपण कोण, आपलें पुढें काय होणार, हें ) मनाला कळावें, सर्व खोटा अभिमान गळून जावा व अशारीतीनें मन शुद्ध झाल्यावर तें पुनः मलीन न व्हावें व ब्रह्मज्ञानाचे योगानें सर्व पाप जळून जावें.

कु+जन+विघ्न+बाधा=दुष्ट जनांनीं आणलेल्या विघ्नांची पीडा; सत्+उक्त+मार्ग=साधूंनीं सांगितलेला मार्ग; स्वतत्त्व= आपण कोण, कोठून आलों; कोठें जाणार, हें तत्त्व; दुर्+अभिमान=खोटा अभिमान; जें खरें नव्हे, मिथ्याभास आहे, त्याचा अभिमान; दुरित=पाप; आत्मबोधें=ब्रह्मज्ञानानें; परमेश्वराच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान होऊन.

मुखीं हरि वसो तुझी कुशलधामनामावली,
क्षणांत पुरवील जी सकळ कामना, मावली;
कृपा करिसी तूं जगत्त्रयनिवास ! दासावरि
तशी प्रकट हे निजाश्रितजना सदा सांवरी. १२०

हे हरी, कल्याणाचें स्थान अशी जी तुझी नामावळी ती माझे तोंडांत राहो; ती आईसारखी तेव्हांच सगळ्या

इच्छा तृप्त करील; हे जगत्त्रयामध्यें राहणाऱ्या देवा, ज्याप्रमाणें दासावर दया करितोस; त्याचप्रमाणें ही तुझी ( नामावळी ) सर्वत्र प्रकट असून म्हणजे कृपा करण्यास तयार राहून, आपला ज्यांनीं आश्रय केला आहे, अशा जनांस संभाळिस्ये.

कुशल+धाम+नाम+आवली=कल्याणाचें घर अशी नामांची पंक्ती; म्हणजे अनंत नामें; जगत्+त्रय+निवास=तीन जगांमध्यें आहे निवास ज्याचा ( राहणें ) ज्याचा, बहु० स० प्रकट=तयार राहून; सावध राहून; निज+आश्रित=आपलें अश्रित असें; सांवरी=संभाळित्ये; नाश होऊं देत नाहीं; संकटांत हात देते.

दयामृतघना, अहो हरि, वळा मयूराकडे;
रडे शिशु, तयासि घे कळवळोनि माता कडे
असा अतिथि धार्मिकस्तुतपदा ? कदा सांपडे ?
तुम्हां जड भवार्णवीं उतरितां न दासां पड. १२१

हे दया अमृताच्या मेघा, हरी, या मयूराकडे वळा; मूल जर रडूं लागलें, तर त्याच्या आईला तेंव्हांच कळवळा येऊन ती त्याला कडेवर घेते; हे धार्मिकांनीं स्तविलीं आहेत पदें ज्यांचीं अशा देवा, तुम्हांला आपल्या दासांना या भवसागरांतून पार उतरण्यास कांहीं जड पडत नाहीं; पण तुम्हांस माझ्यासारख्या ( अत्यंत दरिद्री, अर्थात् कृपा करण्यास अत्यंत योग्य असा ) याचक कधीं सांपडणार आहे ? ( म्हणजे तुम्हीं भक्तांना नेहमीं ताराल; पण तारण करण्यास माझ्यासारखा योग्य याचक कधींही भेटणार नाहीं ).

दया+अमृत+घन=दयारूपी अमृताचा मेघ; पुढें आपणास मयूर म्हटलें आहे, म्हणून येथें परमेश्वरास घन म्हटलें आहे; अतिथी=याचक, भिकारी; धार्मिक+स्तुत +पदा=धार्मिकांनीं म्हणजे दात्यांनीं स्तविलीं आहेत पदें ज्याचीं ( बहु० स० ) असा, म्हणजे दात्यांमध्यें श्रेष्ठ. भव+अर्णव=भवसागर. उतरितां=तारून नेतांना.

**कारुण्यांभोद राम प्रियसख गुरुही जो मयूरा नटाचा**
**होतां तापत्रयार्त, त्वरित. भववनीं रक्षिता रानटाचा.**
**त्याचें साचें स्वभद्रस्मरण, मग न तें त्या कसें ये कवीस**
**केका एका सख्यातें स्मरुनि, करि अशा एकशें एकवीस**
**१२२**

**अन्वय**—जो मयूरा नटाचा कारुण्यांभोद, प्रियसख, गुरुही, भववनीं रानटाचा तापत्रार्त होतां त्वरित रक्षिता; ( तू असा ) मग त्याचें तें साचें स्वभद्र स्मरण त्या कवीस कसें नये ? ( म्हणून तो मयूर ) एका सख्यातें स्मरुनि अशा एकशेंएकवीस केका करी.

जो नृत्य करणाऱ्या मोराचा दयारूपी जलानें पूर्ण असा मेघ, प्रियसखा व ( नृत्यामध्यें ) गुरूही आहे, व भवरूपी अरण्यामध्यें रानटाचा म्हणजे रानटी मोराचा किंवा अज्ञान भक्ताचा रक्षण करणारा आहे, असा जर राम आहे, तर मयूररूपी किंवा मयूरनामक जो कवी, त्याला त्या रामाचें आपल्यास खरोखरी कल्याणकारक असें स्मरण कसें करतां येणार नाहीं ? अर्थात् येईलच; म्हणून असा जो आपला एकच सखा, त्याला ( त्या रामाला ) स्मरून तो मयूर ( कवी ) या एकशेंएकवीस केका ( स्तुतिपर श्लोक ) करिता झाला.

कारुण्य+अंभस्+द=दयारूप जल देणारा (मेघ); गुरूही=मयूरास नृत्य करण्यास शिकविणारा; मोराला मेघच नृत्य करण्यास शिकवितो, म्हणजे नाचावयास लावतो. मयूरा—नटाचा=मयूर ( कवि ) रूपी नृत्य करणारा; जो त्याचा; ताप+त्रय+आर्त =आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक अशा तीन तापांनीं पीडित; रानट=रानटी मोर; किंवा रानट=अज्ञान; स्वभद्र-स्मरण=स्वतःस कल्याणकारक असें स्मरण; सख्यातें=त्या मेघरूपी सख्यातें म्हणजे रामातें.

केकावली—केका म्हणजे मोराचा शब्द. त्या शब्दांची आवली म्हणजे पंक्ती. मोरोपंत कवी आपल्या नांवावरून आपणास मोरपक्षी कल्पून, परमेश्वर हा मेघ आहे अशी कल्पना करितो. व कवितारूप शब्दांनीं त्यास हाका मारितो म्हणून या काव्यास हें नांव दिलें आहे. मोराला मेघ फार आवडतो हें सुप्रसिद्ध आहे. या काव्यांत पंतांनीं आपलें अराध्यदैवत जो राम त्याचे अनेक कथासंबंध वगैरे आणून स्तुती केली आहे; व आपल्यास मोक्ष देण्यासाठीं विनविलें आहे. मोरोपंत विष्णुभक्त होता; तरी शिव व विष्णु एकच, असें समजत असे.

या काव्याच्या एकशें-एकवीस श्लोकांचें वृत्त पृथ्वी आहे; त्याचे लक्षण:—' ज सा ज स य ला ग ज्या पदिं, तयास पृथ्वी म्हणा. शेवटच्या श्लोकाचें वृत्त स्रग्धरा आहे; त्याचें लक्षण ' जेथें मा भ ना या य य सुगण, तया स्रग्धरा नाम देती.

समाप्त.

